॥ ओ३म् ॥ आचार्या नन्दिता चतुर्वेदी, पाणिनि कन्या महाविद्यालय, वाराणसी, सेवार्थ सादर भेंट



।। ओ३म् ।।

# वैदिक विवाहपद्धती

(महर्षी दयानंद सरस्वतीकृत
'संस्कारविधी'वर आधारित)

: संपादक व अनुवादक :
**श्री. भीमाशंकर चंदप्पा साखरे**

**सुरभारती प्रकाशन**
**सीताराम नगर, लातूर**

संपादक व अनुवादक : श्री. भीमाशंकर चंदप्पा साखरे,
श्रीराम मंदिराजवळ, मेन रोड,
आळंद, जि. गुलबर्गा (कर्नाटक)
भ्रमणध्वनी : ०९७४१०९५४६४

प्रकाशक : ज्ञानकुमार आर्य, सुरभारती प्रकाशन,
सीताराम नगर, लातूर - ४१३५३१
भ्रमणध्वनी : ९२२६५८९८७८

आवृत्ती : प्रथम
प्रती : १०००

प्रकाशन : दि. १७.१०.२००९ (महर्षी दयानंद निर्वाणदिन)

अक्षरजुळणी : वेदकुमार रघुनाथ शिंदे
वेद पझेशन्स, लातूर
भ्रमणध्वनी: ९९६०८६१५९२

मुखपृष्ठ व मांडणी : सत्यजित आर्य, आर्य सुपर झेरॉक्स,
सीताराम नगर, लातूर - ४१३५३१
भ्रमणध्वनी : ९०२८३७६९६५

मुद्रितशोधन : ज्ञानकुमार आर्य

मुद्रक : प्रिंट-पॅक बिझनेस फॉर्मस् प्रा.लि.
डी-१६, एम.आय.डी.सी. एरिया, लातूर
दूरध्वनी : ०२३८२- २२०८५७

मूल्य : रु. १२/-

# प्रकाशकीय

जगात वेगवेगळ्या समाजांत व मतपंथांत विवाहाच्या विविध पद्धती प्रचलित आहेत. त्या सर्वांहून वैदिक विवाहपद्धतीचे एक वेगळे असे वैशिष्ट्य आहे. या विधीत वधू-वरांना गृहस्थजीवनात कराव्या लागणाऱ्या कर्तव्यांचा बोध जाणीवपूर्वक करून देण्यात आला आहे.

यापूर्वी वैदिक विवाहविधींचे मराठीतून विवेचन करणारे ग्रंथ अभावानेच निघाले आहेत. गेल्या काही वर्षांपासून अशा ग्रंथाची आवश्यकता तीव्रतेने भासत होती. ही उणीव श्री. भीमाशंकर साखरे यांनी ह्या पुस्तकाच्या रूपाने भरून काढली आहे. त्याबद्दल ते केव्हाही धन्यवादास पात्र आहेत.

वैदिक विवाहपद्धतीतील विधी करण्याच्या बाबतीत बरीच अव्यवस्था दिसून येते. प्रत्येक विधी कसा करावा? कसा केला जातो? हे स्पष्ट होण्यासाठी मुखपृष्ठासह मलपृष्ठांवर काही प्रमुख विधींची (विवाहितांची) चित्रे दिली आहेत. या चित्रांमुळे संभ्रमास जागा राहणार नाही. हेही ह्या ग्रंथाचे वेगळेपण आहे. संबंधितांनी आपली चित्रे छापण्याची परवानगी दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोत.

पूर्वीप्रमाणेच ह्या वेळीही स्वयंप्रेरित दानदात्यांनी आपल्या सात्त्विक दानाने ह्या ग्रंथास भक्कम आधार दिला आहे. 'सुरभारती प्रकाशन' त्यांच्या ऋणातून केव्हाही उतराई होऊ शकणार नाही. श्री. वेदकुमार शिंदे यांनी अत्यंत तत्परतेने या ग्रंथाची अक्षरजुळणी करून दिली. श्री.सत्यजित आर्य यांनी कल्पकतेने मुखपृष्ठ व आतील मांडणी केली. तसेच 'प्रिंट पॅक' च्या संचालकांनी व त्यांच्या कर्मचाऱ्यांनी अतिशय कमी वेळेत ह्या पुस्तकाचे सर्वांगसुंदर मुद्रण करून दिले. या सर्वांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

शेवटी सर्वांच्या सहकार्याने साकारलेली ही 'वैदिक विवाहपद्धती' आपणा सर्वांची मार्गदर्शक होवो ही अपेक्षा! आपल्या योग्य सूचनांचे व त्रुटिनिर्देशांचे स्वागतच आहे. आशा आहे की, पूर्वीप्रमाणेच ह्याही पुस्तकाचे वाचक स्वागत करतील.

दि.१६/१०/२००९ — ज्ञानकुमार आर्य

# माझे अंतरंग

**वदे देव तो एक देवोक्त वेद, करी ऋग्यजुर्भाष्य सत्यार्थबोध,**
**तसे शुद्ध संस्कार सोळा प्रचारी, दयानंद योगेश तो ब्रह्मचारी।।**

आर्यसमाजाचे प्रवर्तक व राष्ट्रोद्धारक महर्षी स्वामी दयानंदांच्या 'संस्कारविधी' ग्रंथातल्या १६ संस्कारांपैकी 'विवाहसंस्कार' हा जनताजनार्दनांच्या सेवेत सादर करीत आहे. पंडित, पुरोहित संस्कार करताना संस्कृत मंत्रोच्चार करत विधी करतात. वेळेअभावी विधींचा अर्थ मराठीत न सांगितल्यामुळे त्यातील गर्भितार्थ व विधीचा हेतू काय तो वधूवरांना व उपस्थितांना कळत नाही. माझे पुतणे चि. शशिकांत - चि.सौ.कां. शोभा व चि. श्रीकांत - चि.सौ.कां. सुनिता ह्यांच्या शुभविवाह प्रसंगी १९८५ मध्ये 'वैदिक विवाहपद्धतीवर एक दृष्टिक्षेप' ही पुस्तिका प्रकाशित केली होती. तीत मंत्र नव्हते, केवळ भावार्थ होता. आता ही सुधारित आवृत्ती आहे. ह्यात मंत्र, विधी, भावार्थ व विवेचन आहे.

ह्या मंगलप्रसंगी परमपिता परमात्म्याला प्रार्थना करतो की, हे पुस्तक वाचल्यावर वाचकांना वेदोक्त उत्तम संस्कारांचा व श्रेष्ठ भारतीय संस्कृतीचा बोध झाला तर माझे परिश्रम काही अंशी फलद्रूप झाले असे समजेन.

हा ग्रंथ तयार करताना माझे आत्मीय स्नेही श्री. ज्ञानकुमार आर्य यांनी अत्यंत परिश्रम घेऊन संस्कारातील गूढ भाव व्यक्त करून योग्य ते मार्गदर्शन केले आहे. त्याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

ह्यातल्या काही विधींत भूल-चूक व संदेह असल्यास अथवा ह्यात काही त्रुटी आढळल्यास सुज्ञांनी अवश्य कळवाव्यात ही विनयपूर्वक विनंती.

दि. ३०/४/२००८

मेन रोड, श्रीराम मंदिर,
आळंद, जि. गुलबर्गा (कर्नाटक)
मो.:०९७४१०९५४६४

आपला नम्र सेवक
भीमाशंकर चंदप्पा साखरे,
(वैदिक पुरोहित)

# समर्पण

माझ्या साहित्यिक वाटचालीत
ज्यांनी मला मोलाचे मार्गदर्शन
केले असे माझे
साहित्यसखा
श्री. ज्ञानकुमार आर्य
यांना सस्नेह अर्पण



– भीमाशंकर साखरे

# या ग्रंथाचे आधारस्तंभ

| | | |
|---|---|---|
| १. | श्री. भीमाशंकर चंदप्पा साखरे, आळंद | रु.५००१/- |
| २. | ॲड. श्री. बापुसाहेब आबासाहेब देशपांडे, आळंद | रु.१००१/- |
| ३. | श्री. चंद्रमोहन चिल्लाळ, गुलबर्गा | रु.१००१/- |
| ४. | श्री. नरसिंहराजा ठाकूर, गुलबर्गा | रु. ५०१/- |
| ५. | श्री. बाबुराव नारायणराव तेरकर, लातूर | रु. ५०१/- |
| ६. | डॉ. नागनाथराव घनाते, गुलबर्गा | रु. ५००/- |
| ७. | श्री. अर्जुन चंदप्पा साखरे, आळंद | रु. ५००/- |
| ८. | डॉ. हरीश रायचूर, सोलापूर | रु. ५००/- |
| ९. | श्री. शशिकांत दत्तात्रयजी बुलबुले, गुलबर्गा | रु. ४५१/- |
| १०. | श्री. दत्तात्रय लक्ष्मणराव सुरे, आळंद | रु. २५१/- |
| ११. | श्री. राधाकृष्ण प्रभाकरराव कालेकर, आळंद | रु. २५१/- |
| १२. | मे. रवी ट्रेडर्स, गुलबर्गा | रु. २५१/- |
| १३. | श्री. बन्सीलालजी गोदानी, सोलापूर | रु. २५१/- |
| १४. | डॉ. देवीदास पुंडलिकराव नवलकेले, मुंबई | रु. २५१/- |
| १५. | श्री. बाबुराव धुळप्पा मड्डे, आळंद | रु. २५०/- |
| १६. | श्री. पुनमचंद भंवरलालजी वर्मा, गुलबर्गा | रु. १०१/- |
| १७. | श्री. गोविंदजी आर्य, गुलबर्गा | रु. १०१/- |
| १८. | श्री. चंद्रकांत मैत्रसकर, बसवकल्याण | रु. १०१/- |
| १९. | डॉ. क. केळकर, सोलापूर | रु. १०१/- |
| २०. | श्री. अरुण चिल्लाळ, गुलबर्गा | रु. १००/- |
| २१. | श्री. किसनराव सरवदे, गुलबर्गा | रु. १००/- |
| २२. | श्री. महेश एकबोटे, आळंद | रु. १००/- |
| २३. | श्री. लक्ष्मणराव गणुरे, बसवकल्याण | रु. १००/- |

# अनुक्रमणिका



---

**“आजकालची वर्ण (जाती) व्यवस्था ही आर्यांसाठी मरणव्यवस्था बनली आहे. पाहू, या डाकिणीपासून आर्यांची केव्हा सुटका होते. त्यासाठी सर्वांनी एकत्र येऊन जातीपातीच्या बंधनांना तोडून आंतरजातीय विवाहाचा प्रचार करावा.”**

**- महर्षी दयानंद सरस्वती**

# आमचे प्रकाशित ग्रंथ

१. उपयोजित पर्यावरण शिक्षण - डॉ.शारदा शेवतेकर पृ.२४४,रु.१८०/-
२. दैनिक पंचमहायज्ञविधी(मराठी) -श्री.भीमाशंकर साखरे पृ.८८,रु.१०/-
३. दैनिक पंचमहायज्ञविधी(हिंदी)- श्री.भीमाशंकर साखरे पृ.११२,रु.१२/-
४. नरशार्दूल पंडित नरेंद्र जी - श्री.भीमाशंकर साखरे पृ.१६, निःशुल्क (दोन आवृत्त्या)
५. वैदिक विवाहपद्धती - श्री.भीमाशंकर साखरे, पृ.७२, रु.१२/-

# आमची आगामी प्रकाशने

१. उपनयन व वेदारंभ संस्कार - श्री.भीमाशंकर साखरे
२. गर्भाधान, पुंसवन, सिमन्तोन्नयन संस्कार - श्री.भीमाशंकर साखरे
३. महानुभव पंथ आणि आर्यसमाज :एक दृष्टिक्षेप-श्री.विनायकराव कदम
४. श्रीमद्भगवद्गीता - काव्यानुवाद (मराठी) - श्री.विनायकराव कदम
५. सुधारणावादी आंदोलनातील आर्यसमाजाचे स्थान - ज्ञानकुमार आर्य
६. असे होते दयानंद - ज्ञानकुमार आर्य
७. क्रांतिविजय - श्री.गुलाबराव देशमुख

# प्राप्तिस्थान

१. सुरभारती प्रकाशन, सीताराम नगर, लातूर
२. श्री. माणिकराव भोसले, आर्य साहित्य भांडार, सीताराम नगर, लातूर
३. श्री. विजयकुमार कानडे, विजय वस्त्र भांडार, निलंगा
४. आर्यसमाज परळी, परळी (वै.) जि. बीड
५. आर्यसमाज पिंपरी, स्टेशन रोड, पिंपरी, पुणे
६. आर्यसमाज सोलापूर, कस्तुरबा मार्केट, सोलापूर
७. आर्यसमाज्ञ संभाजीनगर, सरस्वती कॉलनी, संभाजीनगर (औरंगाबाद)

# सोळा संस्कार : एक विवेचन

**"गर्भाद्या मृत्युपर्यन्ताः संस्काराः षौडशैव हि।"** (संस्कारविधी - पृ. ७)

महर्षी स्वामी दयानंद म्हणतात, "गर्भापासून मृत्यूपर्यंत सोळा संस्कार आहेत." **"दोषनिराकरणपूर्वकगुणाधानसंस्काराः।"** दोषांना दूर करून गुणांची स्थापना करून मानवी जीवनाला समुन्नत करणे हा संस्कारांचा हेतू आहे. आत्मा जेव्हा एका शरीराला सोडून अन्य शरीर धारण करतो तेव्हा पूर्वजन्मांचे प्रभावही त्याच्याबरोबर असतात. ह्या पूर्वजन्मार्जित संस्कारांचा वाहक त्याचे सूक्ष्म शरीर असते. ते एका शरीरातून अन्य शरीरात प्रविष्ट होताना त्यात काही चांगल्या व काही संस्कारांचे प्रभाव वाईट असतात. ह्या वाईट प्रभावांच्या निराकरणार्थ संस्कारांची आवश्यकता असते. संस्कारांचा संबंध मनुष्याचे शरीर व आत्मा ह्यांच्याबरोबर असतो. संस्कार हा पावित्र्यासाठी असतो. संस्कार हे संस्कृतीचे उगमस्थानच आहे. हे संस्कार जगभर स्त्री व पुरुष या दोघांच्यासाठी असल्याचे शास्त्रीय प्रतिपादन आहे. संस्काराने शरीर, मन व आत्मा सुसंस्कृत होऊन धर्म, अर्थ, काम व मोक्षाची प्राप्ती होऊ शकते.

मानवी आयुष्याचा मार्ग एकमेव व सरळ नाही. ठिकठिकाणी हा मार्ग वळसा घेत चक्राकार होत असतो. परम कारुणिक ऋषिमुनींनी सोळा संस्काररूपी दीपस्तंभ निर्माण केले आहेत. ह्या प्रकाशात-ज्ञानात मानव योग्य मार्ग ग्रहण करू शकतो. हे सोळा संस्कार खालीलप्रमाणे आहेत.

१) **गर्भाधान :-** सुप्रजा निर्माण करण्याकरिता.

२) **पुंसवन :-** गर्भ स्थिर झाल्यावर तीन महिन्यांच्या आत गर्भाच्या शारीरिक विकासाकरिता.

३) **सीमन्तोन्नयन :-** गर्भाच्या शारीरिक व मानसिक विकासाकरिता ६ व्या ते ८ व्या महिन्यापर्यंत.

४) **जातकर्म :-** प्रसूतीपूर्वी व प्रसूतीनंतर करावयाचा विधी

५) **नामकरण :-** जन्मानंतर १० व्या दिवशी किंवा १०१ व्या दिवशी किंवा

# आमचे प्रकाशित ग्रंथ

१. उपयोजित पर्यावरण शिक्षण - डॉ.शारदा शेवतेकर पृ.२४४,रु.१८०/-
२. दैनिक पंचमहायज्ञविधी(मराठी) -श्री.भीमाशंकर साखरे पृ.८८,रु.१०/-
३. दैनिक पंचमहायज्ञविधी(हिंदी)- श्री.भीमाशंकर साखरे पृ.११२,रु.१२/-
४. नरशार्दूल पंडित नरेंद्र जी - श्री.भीमाशंकर साखरे पृ.१६, निःशुल्क (दोन आवृत्त्या)
५. वैदिक विवाहपद्धती - श्री.भीमाशंकर साखरे, पृ.७२, रु.१२/-

# आमची आगामी प्रकाशने

१. उपनयन व वेदारंभ संस्कार - श्री.भीमाशंकर साखरे
२. गर्भाधान, पुंसवन, सिमन्तोन्नयन संस्कार - श्री.भीमाशंकर साखरे
३. महानुभव पंथ आणि आर्यसमाज :एक दृष्टिक्षेप-श्री.विनायकराव कदम
४. श्रीमद्भगवद्गीता - काव्यानुवाद (मराठी) - श्री.विनायकराव कदम
५. सुधारणावादी आंदोलनातील आर्यसमाजाचे स्थान - ज्ञानकुमार आर्य
६. असे होते दयानंद - ज्ञानकुमार आर्य
७. क्रांतिविजय - श्री.गुलाबराव देशमुख

# प्राप्तिस्थान

१. सुरभारती प्रकाशन, सीताराम नगर, लातूर
२. श्री. माणिकराव भोसले, आर्य साहित्य भांडार, सीताराम नगर, लातूर
३. श्री. विजयकुमार कानडे, विजय वस्त्र भांडार, निलंगा
४. आर्यसमाज परळी, परळी (वै.) जि. बीड
५. आर्यसमाज पिंपरी, स्टेशन रोड, पिंपरी, पुणे
६. आर्यसमाज सोलापूर, कस्तुरबा मार्केट, सोलापूर
७. आर्यसमाज संभाजीनगर, सरस्वती कॉलनी, संभाजीनगर (औरंगाबाद)

# सोळा संस्कार : एक विवेचन

**"गर्भाद्या मृत्युपर्यन्ताः संस्काराः षौडशैव हि।"** (संस्कारविधी - पृ. ७)

महर्षी स्वामी दयानंद म्हणतात, "गर्भापासून मृत्यूपर्यंत सोळा संस्कार आहेत." **"दोषनिराकरणपूर्वकगुणाधानसंस्काराः।"** दोषांना दूर करून गुणांची स्थापना करून मानवी जीवनाला समुन्नत करणे हा संस्कारांचा हेतू आहे. आत्मा जेव्हा एका शरीराला सोडून अन्य शरीर धारण करतो तेव्हा पूर्वजन्मांचे प्रभावही त्याच्याबरोबर असतात. ह्या पूर्वजन्मार्जित संस्कारांचा वाहक त्याचे सूक्ष्म शरीर असते. ते एका शरीरातून अन्य शरीरात प्रविष्ट होताना त्यात काही चांगल्या व काही संस्कारांचे प्रभाव वाईट असतात. ह्या वाईट प्रभावांच्या निराकरणार्थ संस्कारांची आवश्यकता असते. संस्कारांचा संबंध मनुष्याचे शरीर व आत्मा ह्यांच्याबरोबर असतो. संस्कार हा पावित्र्यासाठी असतो. संस्कार हे संस्कृतीचे उगमस्थानच आहे. हे संस्कार जगभर स्त्री व पुरुष या दोघांच्यासाठी असल्याचे शास्त्रीय प्रतिपादन आहे. संस्काराने शरीर, मन व आत्मा सुसंस्कृत होऊन धर्म, अर्थ, काम व मोक्षाची प्राप्ती होऊ शकते.

मानवी आयुष्याचा मार्ग एकमेव व सरळ नाही. ठिकठिकाणी हा मार्ग वळसा घेत चक्राकार होत असतो. परम कारुणिक ऋषिमुनींनी सोळा संस्काररूपी दीपस्तंभ निर्माण केले आहेत. ह्या प्रकाशात-ज्ञानात मानव योग्य मार्ग ग्रहण करू शकतो. हे सोळा संस्कार खालीलप्रमाणे आहेत.

**१) गर्भाधान :-** सुप्रजा निर्माण करण्याकरिता.

**२) पुंसवन :-** गर्भ स्थिर झाल्यावर तीन महिन्यांच्या आत गर्भाच्या शारीरिक विकासाकरिता.

**३) सीमन्तोन्नयन :-** गर्भाच्या शारीरिक व मानसिक विकासाकरिता ६ व्या ते ८ व्या महिन्यापर्यंत.

**४) जातकर्म :-** प्रसूतीपूर्वी व प्रसूतीनंतर करावयाचा विधी

**५) नामकरण :-** जन्मानंतर १० व्या दिवशी किंवा १०१ व्या दिवशी किंवा

दुसऱ्या वर्षाच्या प्रारंभी बाळाचे अर्थपूर्ण नाव ठेवणे.

**६) निष्क्रमण :-** चौथ्या महिन्यात बाळाला सूर्य व चंद्रदर्शन करविणे.

**७) अन्नप्राशन :-** पचनशक्तीप्रमाणे ६ व्या महिन्यात अन्न देणे.

**८) चूडाकर्म :-** एक वर्षापासून ३ वर्षापर्यंत केस (जावळ) काढणे.

**९) कर्णवेध :-** ३ ऱ्या किंवा ५व्या वर्षात कान टोचणे.

**१०) उपनयनः-** ८ व्या ते २४ व्या वर्षापर्यंत यज्ञोपवीत धारण व विद्यार्जन.

**११) वेदारंभ :-** ८ व्या वर्षी वेदाध्ययन, गायत्री मंत्र व विद्याभ्यास.

**१२) समावर्तन :-** विद्याभ्यास संपूर्ण झाल्यावर पदवीदान समारंभ.

**१३) विवाह :-** सुप्रजावृद्धीकरिता स्त्री-पुरुषांना एकसूत्रात बांधणे.

**१४) वानप्रस्थ :-** आत्मचिंतन व परमात्मचिंतनाकरिता गृहस्थाश्रमातून निवृत्त होऊन त्यागी बनणे.

**१५) संन्यास :-** सकाम कर्मांचा त्याग करून निष्काम कर्म करत समस्त जीवन मानवजातीच्या हिताकरिता वाहणे.

**१६) अन्त्येष्टि :-** हा संस्कार आत्म्याकरिता नसून मृत शरीराकरिता आहे. शरीराला भस्म करेपर्यंत हा संस्कार असतो. शरीराचा प्रारंभ ऋतुदान व अंत ह्या मृतककर्माने होतो.

१६ संस्कारांपैकी १३ संस्कार त्या वयात होतात जेव्हा संस्कारांनी मानवाला सुसंस्कृत करू शकतोत. आजच्या वैज्ञानिक युगातसुद्धा हे संस्कार मानवजातीला प्रेरणा व स्फूर्ती देऊ शकतात. वेगवेगळ्या जातींतून शुभ गुण एकाच वेळी जाऊ शकत नाहीत व एकाच वेळी येत नाहीत. ह्याकरिता फार काळ लागतो. यास्तव आपणांस संस्कारांवर विशेष भर दिला पाहिजे. मानवसमाजाला सुधारण्याचा हा एक महत्त्वपूर्ण प्रयत्न आहे.

आजच्या विज्ञानयुगात कृत्रिमरित्या 'जिवाणू' (जीन्स) निर्माण करून त्याने मानवाचे नवनिर्माण केले जात आहे. 'जिवाणूं'मुळे नवनिर्माणाची प्रक्रिया ही की एक प्रकारच्या गुणांच्या जिवाणूला प्रजनन तत्त्वातून काढून तेथे दुसऱ्या

प्रकारच्या गुणांचे जिवाणू आरोपित (इम्प्लांट) करणे होय. हा विज्ञानाचा चमत्कार आहे खरा, परंतु यशस्वीपणा कोठपर्यंत होईल हा संदेह आहे. आजचे विज्ञान-प्रयोग आणि धार्मिक संस्कारपद्धती या दोहोंचा उद्देश एकच आहे. तो म्हणजे मानवाच्या विकासाची दिशा बदलणे, वंशानुसंक्रमणातून (Heredity) सुटका करणे व पर्यावरणापासून (Environment) सुरक्षा करून उन्नत करणे.

## वैदिक विवाह : एक विवेचन

मानवी जीवनाची चार कालखंडांत (आश्रमांत) विभागणी केली गेलेली आहे. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास. ज्याप्रमाणे प्राणवायू हा सर्व जिवांचा मूलाधार आहे, त्याप्रमाणेच गृहस्थींच्या आश्रयाने ब्रह्मचारी, वानप्रस्थी व संन्यासी या सर्व आश्रमांचा निर्वाह होतो. (मनु. ३।७७।।)

ह्या विश्वात मनुष्य देवऋण, ऋषिऋण व पितृऋणांच्या ओझ्याने दबून गेलेला आहे. पैकी पितृऋणातून मुक्त होण्यासाठी संतानोत्पत्ती करणे हे एक प्रमुख धार्मिक कर्तव्य आहे. पुरुष परब्रह्माचा व नारी प्रकृतीची - प्रतिनिधी, जे दोन्ही महान व अपूर्ण आहेत. विवाहयज्ञवेदीवर या अपूर्णांचा मेळ होऊन त्यांना पूर्णत्व प्राप्त होते. या मोहक मिलाफालाच 'विवाह' अथवा 'जीवनरथ' म्हटले आहे.

गृहस्थाश्रमाबद्दल महर्षी स्वामी दयानंद लिहितात - "ऐहिक आणि पारलौकिक सुखप्राप्तीसाठी आपआपल्या सामर्थ्यानुसार सन्तानोत्पत्ती करणे याचेच नाव 'गृहस्थाश्रम' आहे.

गृहस्थधर्म हाच ज्येष्ठ व श्रेष्ठ धर्म आहे. गृहस्थाश्रम हा मनुष्यास भिन्नतेकडून एकतेकडे, अपूर्णाकडून पूर्णत्वाकडे-अमरत्वाकडे नेणारा आहे. विवाह हे एक सामाजिक बंधन आहे. केवळ दोन व्यक्ती, दोन परिवारच नव्हे तर दोन समाजांना एकत्र गुंफणारे सूत्र आहे. स्त्री-पुरुषाचे संयुक्त जीवनच संपूर्ण जीवन आहे. विवाहाच्या पवित्र बंधनाजवळ आलेल्या दोन जिवांनी

एकमेकांच्या आध्यात्मिक उन्नतीसाठी पूरक ठरायचे असते. वैवाहिक जीवनामुळे एकमेकांच्या स्वभावदोषांचे निर्मूलन होऊन, शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक स्तरावर एकरूपता होण्याने एकमेकातील प्रेम वाढते व जीवन अधिक समृद्ध व सुखावह होऊ शकते. 'ईशचिंतना'मुळे वैवाहिक जीवन सुखी व समाधानी होण्यास अधिक मदत होते. जो मनुष्य दोघांच्या एकत्रित जगण्यात व सहजीवनात सफल होत नाही तो अन्य सामाजिक कार्यांतदेखील यशस्वी होऊ शकणार नाही. अशा या पवित्र व सर्वश्रेष्ठ वैवाहिक जीवनात प्रविष्ट होणाऱ्या प्रचलित पद्धती बलहीन व दिशाहीन बनल्या आहेत. विवाहापूर्वी मुला-मुलीची कुंडली पाहिल्यामुळे उत्तम संस्काराची मुले व सुसंस्कारित मुली स्वीकारल्या जात नाहीत. २६ किंवा ३६ गुण न पाहता पुरुष व स्त्रीची शारीरिक तपासणी करावी. वैदिक विवाहसंस्काराबद्दल श्रीमती ॲनी बेझंट यांनी लिहिले आहे की, जगातील कोणत्याही देशात, कोणत्याही जातीत व कोणत्याही धर्मात प्राचीन आर्षग्रंथात व्यक्त केल्याप्रमाणे विवाहाचे महत्त्व असे गंभीर व पवित्र नाही. वैदिक धर्मात गुणकर्मस्वभावाकडे ध्यान देण्यावर अधिक भर दिलेला आहे. पण आज विवाह चमडी व दमडी पाहून ठरविले जातात. समाज ह्याविषयी चिंतन करत नाही, ध्यान देत नाही ही खेदाची बाब आहे. यासंदर्भात महर्षी दयानंदांनी म्हटले आहे की, कन्या (वधू) दूर ठिकाणाची असावी. **'दुहिता दुर्हिता दूरे हिता भवतीति।'** याबरोबरच आंतरजातीय, आंतरप्रांतीय व आंतरदेशीय विवाह करण्यावर त्यांनी जोर दिला आहे.

वैदिक विवाहपद्धती ही श्रेष्ठ, सुसंस्कृत व वैधानिक असल्याने धार्मिकतेची मूलतत्त्वे दृढ होतात. गृहस्थजीवनरूपी मंदिराचा हा खरा भक्कम पाया आहे. या विधीत उपस्थित जनसमुदायासमोर अग्निदेवतेच्या साक्षीने पवित्र वेदमंत्राचे पठण होते. वधू-वर विविध क्रिया करतात. सत्कार, कन्यावरण, पाणिग्रहण, शिलारोहण, लाजाहोम, यज्ञप्रदक्षिणा, सप्तपदी, सूर्यावलोकन, हृदयस्पर्श, ध्रुव व अरुंधतीदर्शन अशा विविध स्वरूपांत प्रतिज्ञा करत, परस्परास अभिवचन

देत, आश्वासनपूर्वक एक-दुसऱ्याचा हात हाती घेत हृदयस्पर्श करतात व असे समजतात की हा संबंध जन्मजन्मांतराचा घट्ट आहे. 'वि' म्हणजे विशेषरूपाने, 'वाह'चा अर्थ वहन करणे-स्वीकारणे. विवाह हे एक असे वाहन आहे की ज्याची दोन चाके स्त्री व पुरुष आहेत. वैवाहिक जीवन हे साध्य व विवाह पद्धति हे एक साधन आहे. साध्य व साधन हे दोन्ही पवित्र, आदर्श व प्रेरणादायक असावेत. जीवनाचे साफल्य क्रियात्मक आचरणावरून सिद्ध होते. वैदिक विवाहपद्धतीत पवित्रता, आदर्श संकेत व संदेश आहेत. वधू-वरांना क्रियात्मक दृष्टी घेण्यासाठी प्रेरणा देणारी ही पद्धती आहे. यातून उभयतांच्या भावी जीवनाचा अभ्युदय होऊ शकतो. परंतु सध्या अनेक कारणांनी निर्माण झालेले गौण व धार्मिक विधि बाजूला पडून लौकिक प्रकार विवाहात घुसले आहेत. ते म्हणजे रोषणाई, वराची घोड्यावरून भव्य व शानदार मिरवणूक, विविध बँड व ढोल, समोर नाचगाणे, हूऽहाही ओरडत नाचत गोंधळ घालणे इत्यादी. बऱ्याच लग्नांत मदिरा व मांसपार्ट्याही होत असतात.

वैदिक विवाहपद्धती ही अनेक टप्प्यांत विभागली गेली आहे. प्रत्येक टप्पा हा एक विशेष जाणीव दर्शविणारा असून वधू-वरांना शिक्षण व ज्ञान प्राप्त करून देणारा आहे.

## विवाहविधी प्रारंभ (पूर्वविधी)

**सत्कारविधी :-**

सामान्यपणे विवाहसंस्कार हा वधूच्या घरी व्हावयास हवा. विवाहसंस्कार अनुकूलतेप्रमाणे कोणत्याही दिवशी केला जाऊ शकतो. या संस्कारासाठी वर व वराकडील मंडळी वधूच्या घरी विवाहमंडपात येतात हीच वराची वरात होय. वरात वधूच्या दारात येते तेव्हा वधू, वधूचे माता-पिता व आप्तेष्ट दारात स्वागत करतात. येणाऱ्या अतिथीस पूज्य, वंदनीय मानून त्यांचे योग्य ते आदरातिथ्य करण्याचे हे जणू प्रशिक्षणाचे प्रात्यक्षिकच आहे. वधू वराच्या गळयात पुष्पमाला घालते, वरही वधूच्या गळयात पुष्पमाला घालून आपल्या

नववधूचा सत्कार करतो. घरी येणारी वधू हीसुद्धा अतिथीच असते. गृहस्थजीवनाचा आरंभ अशा परस्परांच्या आदरसत्काराने होतो. हा केला जाणारा आदरसत्कार ह्या दिवसापुरताच नसतो तर आजन्म करावयाचा असतो, हा खरा गृहस्थधर्म.

आलेल्या वरास वधू सुंदर सुशोभित आसनावर बसण्याची प्रार्थना करते. तिच्या दृष्टीने पती हा तिचा देवच (नवरदेव) तर पतीच्या दृष्टीने पत्नी ही देवता. दोघेही परस्परांस वंदनीयच असतात. ही भवना सतत जागृत ठेवण्यास सांगणारा हा पहिला टप्पा आहे.

प्रथम वराने वधूच्या घरात प्रवेश करून पूर्वाभिमुख उभे राहावे. नंतर **वधू, वधूचे आई-वडील व अन्य कार्यकर्त्यांनी** वराजवळ उत्तराभिमुख उभे राहून पुढील वाक्य म्हणावे –

**साधु भवानास्तामर्चयिष्यामो भवन्तम्।।** पार. १।३।४

– आपण चांगल्या प्रकारे सुखपूर्वक विराजमान व्हावे. आम्ही आपले स्वागत करत आहोत.

त्यावर **वराने** असे प्रत्युत्तर द्यावे -

**ओम् अर्चय ।।**

– स्वागत करावे.

नंतर **वधूने** वरासाठी ठेवलेले उत्तम आसंन हातात घ्यावे व ते वरासमोर धरून म्हणावे -

**ओं विष्टरो विष्टरो विष्टर : प्रतिगृह्यताम् ।।**

– आपण या उत्तम आसनाचा स्वीकार करावा.

**वराने**

**ओम् प्रतिगृह्णामि ।।**

– मी स्वीकार करतो.

असे म्हणून वधूच्या हातून आसन घेऊन त्यावर विवाहमंडपात पूर्वाभिमुख बसून म्हणावे -

**ओं वर्ष्मोऽस्मि समानानामुद्यतामिव सूर्यः।**
**इमं तमभितिष्ठामि यो मा कश्चाभिदासति।।** **पार०१।३।८।।**

– प्रकाशमान नक्षत्रांमधील श्रेष्ठ सूर्याप्रमाणे मी कुळ, ज्ञान, आचरण, शरीर, स्वास्थ्य, धन, प्रतिष्ठा इत्यादी गुणांनी बरोबरीच्या लोकांमध्ये सर्वश्रेष्ठ व तेजस्वी आहे. असा मी या आसनावर बसत आहे. जो कोणी मला अपमानित करू इच्छील त्याला मी या आसनाप्रमाणे खाली दाबून टाकीन.

त्यानंतर **वधूने** सुंदर पात्रात पाणी भरून वराच्या पुढे धरून म्हणावे-

**ओं पाद्यं पाद्यं पाद्यं प्रतिगृह्यताम् ।।**

– हातपाय धुण्यासाठी हे शुद्ध पाणी घ्यावे.

**ओम् प्रतिगृह्णामि।।**

– 'मी स्वीकार करतो' असे म्हणून वधूच्या हातून जलपात्र घेऊन हात-पाय धुवावे व म्हणावे -

**ओं विराजो दोहोऽसि विराजो दोहमशीय मयि पाद्यायै विराजो दोहः।।**

**पार. १।३।१२।।**

– हे पाण्या! तू या विराट विश्वाचे सार आहेस. श्रमपरिहारासाठी मी या सुशोभित जलास प्राप्त करत आहे. माझ्या पायांचा थकवा दूर करण्यासाठी हे जल उपस्थित आहे.

त्यानंतर मुख धुण्याकरिता पाण्याने भरलेला तांब्या वराला देत **वधूने** म्हणावे -

**ओम् अर्घोऽर्घोऽर्घः प्रतिगृह्यताम्।।** **पार. १।३।१३।।**

- तोंड धुण्यासाठी हे पाणी घ्यावे.

पाण्याचा तांब्या घेत **वराने** –

**ओं प्रतिगृह्णामि ।।**

– मी स्वीकार करतो.

असे म्हणून तोंड धुतल्यावर म्हणावे –

**ओम् आप स्थ युष्माभिः सर्वान् कामानवाप्नवानि।**
**ओं समुद्रं वः प्रहिणोमि स्वं योनिमभिगच्छत।**
**अरिष्टास्माकं वीरा मा परासेचि मत्पयः।।** **पार. ।१।३।१३,१४।।**

– हे जलांनो! तुम्ही माझे हित करणारे आहात. तुम्हांपासून मी आरोग्यरूपी सर्व मनोरथांना साध्य करावे. मी तुम्हांला समुद्राकडे पाठवतो. कारण की तुम्ही आपल्या कारणभूत मेघरूपात परिवर्तित व्हावे. आमची शूर संतती रोग-दुःख-दारिद्र्यरहित व्हावी. आम्हांस कधी पाण्याचा अभाव न व्हावा.

त्यानंतर **वधूने** आचमनपात्रात पाणी भरून ते वराला देत म्हणावे-

**ओम् आचमनीयं आचमनीयं आचमनीयं प्रतिगृह्यताम्।।** **पार. १।३।५,६।।**

– आचमनासाठी जलाचा स्वीकार करावा.

**वराने –**

**ओं प्रतिगृह्णामि।।**

– मी स्वीकार करत आहे.

असे म्हणून वधूकडून आचमनपात्र घेऊन तीन वेळा आचमन करत म्हणावे -

**ओम् आ मागन् यशसा सँसृज वर्चसा।**
**तं मा कुरु प्रियं प्रजानामधिपतिं पशुनामरिष्टिं तनूनाम्।।**
**पार. ।१।३।७।।**

– हे जलांनो! तुम्ही मला चोहोकडून प्राप्त झालेले आहात. मला आपल्या यश, कांती आणि तेजाने युक्त करा. मला लोकांमध्ये प्रिय बनवा, पशूंचा स्वामी बनवा आणि शरीराने निरोगी बनवा.

## मधुपर्काने सत्कार

**वधूने** मधुपर्कपात्र हातात घेऊन वराला विनंती करावी -

**ओं मधुपर्को मधुपर्को मधुपर्कः प्रतिगृह्यताम्।।**
**तुलना - पार. ।१।३।५,६।।**

– हा मधुपर्क आहे, कृपया याचा स्वीकार करावा.

**वराने - ओं प्रतिगृह्णामि।।**

– मी स्वीकार करतो.

असे म्हणून ते पात्र वधूकडून घ्यावे व खालील मंत्र म्हणत मधुपर्काकडे पाहावे.

**ओं मित्रस्य त्वा चक्षुषा प्रतीक्षे।।** **पार. ।१।३।१६।।**

– मी तुला हितकर्त्याच्या दृष्टीने पाहत आहे.

पुन्हा **वराने** मधुपर्कपात्र डाव्या हातात घेऊन म्हणावे -

**ओं देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोबाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यां प्रतिगृह्णामि।।**

**तुलना - यजु. ।१।१०।१७।।, पार. ।१।३।१७।।**

– सविता देवाच्या सृष्टीत मी तुझा विशाल बाहूंनी आणि बलशाली हातांनी स्वीकार करत आहे.

नंतर खालील तीन मंत्र म्हणत मधुपर्काचे अवलोकन करावे -

**ओं भूर्भुवः स्वः। मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः। माध्वीर्नः सन्त्वोषधीः।।१।।**

**ओं भूर्भुवः स्वः। मधुनक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवँ्रजः। मधु द्यौरस्तु नः पिता।।२।।**

**ओं भूर्भुवः स्वः। मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः। माध्वीर्गावो भवन्तु नः ।।३।।** **यजु.१३।२७-२९।।**

**भावार्थ :-** हे सच्चिदानंदस्वरूप परमात्मा! प्रत्येक ऋतूत मधुर वारे वाहावेत. नद्या व जलाशयातून मधुर जल वाहावे. आमच्यासाठी औषधे, रात्री, उषःकाल, पृथ्वीचा प्रत्येक कण, पर्जन्याद्वारे आमचे पोषण करणारे आकाश, वनस्पती हे सर्व पदार्थ मधुर असावेत. ते मला माधुर्य देवोत, माझे जीवन मधुर बनवोत. आमच्यासाठी सूर्य मधुर व्हावा अर्थात तापदायक नसावा. गाय इ. पशू मधुर, लाभदायक व्हावेत. मला सर्वत्र माधुर्याचा अनुभव व्हावा.

नंतर उजव्या हाताची तर्जनी व अंगठा यांनी मधुपर्कास हलवून, कालवून खालील मंत्र म्हणावा -

**ओं नमः श्यावास्यायान्नशने यत्ते आविद्धं तत्ते निष्कृन्तामि।।** पार. ।१।३।८।।

- हे जठराग्नी! हा मधुपर्क तुझ्यासाठी अन्न आहे. तुझ्यासाठी भोज्य (सेवन करण्यास योग्य) अशा या मधुपर्कात पडलेले अनिष्टकारक पदार्थ मी काढून टाकत आहे.

नंतर खालील मंत्र म्हणत त्या-त्या दिशेकडे बोटांनी मधुपर्क शिंपडावा.

**ओं वसवस्त्वा गायत्रेण च्छन्दसा भक्षयन्तु ।।१।।** पूर्व दिशा

**ओं रुद्रास्त्वा त्रैष्टुभेन च्छन्दसा भक्षयन्तु ।।२।।** दक्षिण दिशा

**ओम्आदित्यास्त्वा जागतेन च्छन्दसा भक्षयन्तु ।।३।।** पश्चिम दिशा

**ओं विश्वे त्वा देवा आनुष्टुभेन च्छन्दसा भक्षयन्तु ।।४।।** उत्तर दिशा

**ओं भूतेभ्यस्त्वा परिगृह्णामि ।।** तीन वेळा वर शिंपडावे.

**भावार्थः-** हे मधुपर्का! यज्ञवेदीच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर या दिशांना क्रमशः विराजमान असलेले वसू, रुद्र, आदित्य आणि विश्वेदेव संज्ञा (नाव) असलेले विद्वान क्रमशः गायत्री, त्रिष्टुप, जगती व अनुष्टुप छन्द म्हणत तुझे भक्षण करोत. आपल्या शरीराचे निर्माण करणाऱ्या पंचमहाभूतांच्या नावाने त्यांच्या उपयोगासाठी मी तुझा स्वीकार करत आहे.

यानंतर **वराने** मधुपर्काचे तीन भाग करून काशाच्या तीन पात्रांत ठेवावेत व खालील मंत्र तीन वेळा म्हणत एक-एक पात्रातील थोडा-थोडा मधुपर्क प्राशन करावा -

**ओं यन्मधुनो मधव्यं परमँ् रूपमन्नाद्यम् । तेनाहं मधुनो मधव्येन परमेण रूपेणान्नाद्येन परमो मधव्योऽन्नादोऽसानि ।।**

- फुले, अन्न व वनस्पती यांचे हे सर्वोत्कृष्ट, भक्षणीय, स्वच्छ स्वरूप आहे. त्याचे भक्षण करून मी मधुरभाषी, मधुर स्वभावाने युक्त व्हावे.

त्यानंतर पुढील दोन मंत्रांनी आचमन करावे -

**ओम् अमृतापिधानमसि स्वाहा ।। ओं सत्यं यशः श्रीर्मयि श्रीः श्रयतां स्वाहा।।**

त्यानंतर **वराने** पुढील मंत्रांनी अंगस्पर्श करावा –

## मार्जनमंत्र

**ओं वाङ्म आस्येऽस्तु ।।** मुखाला

**ओं नसोर्मे प्राणोऽस्तु।।** दोन्ही नाकपुड्यांना

**ओम् अक्ष्णोर्मे चक्षुरस्तु ।।** दोन्ही डोळ्यांना

**ओं कर्णयोर्मे श्रोत्रमस्तु ।।** दोन्ही कानांना

**ओं बाह्वोर्मे बलमस्तु ।।** दोन्ही बाहूंना

**ओम् ऊर्वोर्म ओजोऽस्तु ।।** दोन्ही मांड्यांना

**ओम् अरिष्टानि मेऽङ्गानि तनूस्तन्वा मे सह सन्तु।।** शरीराच्या सर्व अवयवांवर.

**विवेचन :-** वराचे पाय धुण्यास, मुखप्रक्षालनास व आचमन करण्यास वेगवेगळे पाणी दिले जाते. आचमन व अंगस्पर्शाने सारे शरीररूपी मंदिर पवित्र व शुद्ध केल्याशिवाय आत्मा पवित्र राखणे शक्यच नाही. यानंतर मधुपर्क दिला जातो. मध, दही व तूप यांचे विशिष्ट प्रमाणात केलेले मिश्रण आरोग्यवर्धक, बलवर्धक व श्रमपरिहारक औषधीच आहे. सर्व दिशांकडे सिंचन करून वर त्याचे प्रसन्नतापूर्वक प्राशन करतो. प्रथम दहा दिशांतील भुकेलेल्या प्राणिमात्रांचा विचार आणि मगच स्व-सेवन व ते आजन्म पाळणे, ही एक आदर्श शिकवण आहे. मानवाला भोग्यपदार्थ एकट्याने श्रम केल्याने प्राप्त होत नसून त्यात अनेकांचे प्रयत्न व सहकार्य असते म्हणून इतरांना देऊन आपण सेवन करावा.

## गोदान

गाय ही भारतीय संस्कृतीची प्रतीक आहे. विवाहप्रसंगी गोदानाचे विधान करून ऋषिमुनींनी गोरक्षणाचा अमोघ उपाय निवडला. आपली कन्या ज्या घरात पदार्पण करणार ते घर दुधातुपाने, धनधान्याने संपन्न असावे, असे कोणत्या माता-पित्यांना वाटणार नाही? म्हणूनच वधूपिता आपल्या सुकन्येला

गोदान करतो. आता बऱ्याच कारणांनी गाईचे पालनपोषण होऊ शकत नाही यास्तव गाईऐवजी द्रव्यदान दिले जाते.

नंतर **वधूने** आपल्या शक्तीनुसार वरास योग्य असे गोदानादी द्रव्य खालील मंत्र म्हणून द्यावे.

**ओं गौर्गौर्गौः प्रतिगृह्यताम्।।**

– बुद्धी व धनधान्यादींची प्रतिनिधीरूप असलेल्या या गाईचा स्वीकार करावा.

त्यावर **वराने – ओं प्रतिगृह्णामि।।** - मी स्वीकार करतो.

असे म्हणून वधूने दिलेले द्रव्यादी घ्यावे.

## कन्यादान

**विवेचन :** वैदिक विवाहपद्धतीतील कन्यादान हा एक हृदयस्पर्शी विधी आहे. माता-पित्यांनी ज्या कन्येला जन्म दिला, जिचे लालनपालन, कोडकौतुक केले, जिचा शारीरिक, मानसिक, बौद्धिक व शैक्षणिक स्तर उंचावण्यासाठी अहोरात्र परिश्रम केले, त्या आपल्या सुकन्येला आपल्या हाताने वराच्या स्वाधीन करताना त्या माता-पित्यांच्या हृदयात कालवाकालव होणे, गहिवरून येणे साहजिकच आहे. मुलीच्या गुणकर्मस्वभावास अनुरूप जीवनसाथी आपण निवडून त्या सुयोग्य साथीदाराच्या हाती आपल्या सुकन्येचा हात आपण सोपवीत आहोत याचा आनंद माता-पित्यांना झाला पाहिजे. आपली कन्या ही सरिता आहे. ती सागरास मिळण्यात अर्थात पतिरूपी सागरात विलीन होण्यातच तिच्या जीवनाची सार्थकता आहे. आता त्या सरिताधारेस रोकणे इष्ट नाही. तिच्यातील जीवनरूपी जल निर्मळ, शुद्ध व स्वच्छ ठेवण्यातच खरी धन्यता आहे. म्हणून मनाला होणाऱ्या वेदना बाजूस सारून आनंद मानला पाहिजे व यास आनंदसोहळा बनविले पाहिजे. कन्या समर्पित केली जाते ते केवळ वराची सेवा करण्याकरिताच नसून वराच्या माध्यमातून शाश्वत, सनातन धर्माची सेवा करण्यासाठी धर्म रक्षणासाठी, धर्म वृद्धिंगत करण्यासाठी. किती आदर्श व उदात्त कल्पना आहे ही!

यानंतर **वधूच्या आई-वडिलांनी** किंवा **कार्यकर्त्यांनी** पुढील मंत्र म्हणून वराच्या उजव्या हातात वधूचा उजवा हात ठेवून कन्यादान करावे.

**ओम् अमुक[1] गोत्रोत्पन्नामिमाममुक[2]नाम्नीम्**

**अलंकृतां कन्यां प्रतिगृह्णातु भवान्।।**

....... या गोत्रात / कुळात उत्पन्न झालेल्या ....... नावाच्या, वस्त्रालंकारांनी सुशोभित झालेल्या या कन्येचा आपण स्वीकार करावा.

**वराने – ओम् प्रतिगृह्णामि।।** - मी कन्येचा स्वीकार करतो.

असे म्हणावे.

## वस्त्रधारण

शरीर आच्छादन, प्रतिष्ठा, दीर्घायुरारोग्य प्राप्तीसाठी तसेच शरीररूपी धनाच्या पुष्टीसाठी वराकडून वधूस आपल्या घरी कातून विणलेलें शुद्ध खादीचे वस्त्र दिले जाते. वर स्वतःही वस्त्र धारण करतो. या ठिकाणी एका अर्थाने वर उत्तम वस्त्रालंकारांनी आपल्या सहचारिणीस अगदी वृद्धावस्थेपर्यंत नटवून ठेवण्याचा जणू संकल्पच करतो. परमात्मा मनुष्याला बनवतो तर वस्त्रांनी त्याला शोभा येते.

यानंतर **वराने** खालील मंत्र म्हणून वधूस उत्तम वस्त्रे द्यावीत.

**ओं जरां गच्छ परिधत्स्व वासो भवा कृष्टीनामभिस्तिपावा। शतं च जीव शरदः सुवर्चा रयिं च पुत्राननुसंव्ययस्वायुष्मतीदं परिधत्स्व वासः।।**

**पार. ।१।४।१२।।**

**ओं या अकृन्तन्नवयन् या अतन्वत याश्च देवीस्तन्तूनभितो ततन्थ। तास्त्वा देवीर्जरसे संव्ययस्वायुष्मतीदं परिधत्स्व वासः।।** **पार. ।१।४।१३।।**

---

१. 'अमुक' शब्दाच्या जागी वधूच्या गोत्राचे व कुळाचे नाव उच्चारावे

२. 'अमुक' पदाच्या जागी वधूचे नाव द्वितीया विभक्तीच्या एकवचनात उच्चारावे. जसे -'ओं कश्यपगोत्रोत्पन्नमिमां वसुन्धरां नाम्नीम्'

**भावार्थ :-** हे आयुष्मती! शील आणि शरीररक्षणासाठी ह्या सुंदर वस्त्रांना योग्य प्रकारे धारण कर. वृद्धावस्थेपर्यंत माझ्याबरोबर चल. जनसमुदायात प्रशंसनीय हो, वर्चस्विनी होऊन शंभर वर्षे जग. पतीच्या अनुकूल आचरण करून धन व पुत्रांना प्राप्त कर.

ज्या स्त्रियांनी स्वतःच्या हातांनी सूत कातून, विणून, शिवून ही महावस्त्रे तयार केली आहेत, त्यांच्याशी वृद्धावस्थेपर्यंत चांगले संबंध ठेव.

नंतर **वरानेही** खालील मंत्र म्हणून स्वतः वस्त्रे धारण करावीत.

**ओं परिधास्यै यशोधास्यै दीर्घायुत्वाय जरदृष्टिरस्मि। शतं च जीवामि शरदः पुरूची रायस्पोषमभिसंव्ययिष्ये ।।** पार. ।२।६।२०।।

**ओं यशसा मा द्यावापृथिवी यशसेन्द्राबृहस्पती। यशो भगश्च मा विन्दद्यशो मा प्रतिपद्यताम् ।।** पार. ।२।६।२१।।

**भावार्थ :** हे पितरांनो! वस्त्रांनी शरीर झाकण्यासाठी, कीर्ती धारण करण्यासाठी, दीर्घायुष्यासाठी, वृद्धावस्थेपर्यंत जीवित राहण्यास मी संकल्पबद्ध आहे. सर्व सुखांची पूर्तता करणाऱ्या शंभर शरदऋतूंपर्यंत मी जीवित राहावे. वृद्धावस्थेपर्यंत ज्ञानी आणि धनी होऊन राहावे. सूर्य आणि पृथ्वीप्रमाणे असलेले पिता व माता मला कीर्ती व प्रतिष्ठेसह मिळावेत. समाजातील धनवान व विद्वान मला प्राप्त व्हावेत. आणि ऐश्वर्यशाली व तेजस्वी पुरुषांकडून मला कीर्ती व ऐश्वर्य प्राप्त व्हावे. जीवनात माझी नेहमी कीर्ती वाढत राहील असा आशीर्वाद मला द्यावा.

## यज्ञाची तयारी

**विवेचन :** यज्ञ हे मानवी जीवनातील श्रेष्ठतम, पवित्र व पुण्यकर्म आणि त्यागाचे प्रतीक आहे. पवित्र अंतःकरणाने हा विधी यथासांग पार पाडावयाचा असतो. यज्ञातील **'इदन्न मम'** ही भावना महत्त्वाची आहे. 'हे प्रभो! हे माझे नाही. हे सर्व तुझेच आहे. तुझे तुलाच मी समर्पण करीत आहे.' याप्रमाणे हे यज्ञकर्म त्यागाची आदर्श शिकवण देण्यासाठी आहे. यज्ञकर्मामुळे त्यागाची प्रतिष्ठापना तर होतेच पण काही भौतिक लाभही होतात. या पवित्र कर्मामुळे अखिल प्राणिमात्रांचे कल्याण होते.

प्रदूषित झालेल्या हवेचे शुद्धीकरण करण्याची अद्‌भुत शक्ती या यज्ञकर्मात आहे. अन्न, जलवायूच्या शुद्धीकरणाबरोबर घातक रोगजंतूंचा संहार करण्याचे सामर्थ्यदेखील या यज्ञात आहे. यामुळेच जगातील शास्त्रज्ञांचे लक्ष आता भारतीय यज्ञकर्मावर केंद्रित झाले आहे. यज्ञातील वैज्ञानिक तथ्य वैज्ञानिक ढंगानेच आता जगासमोर येऊ पाहत आहे.

## कलशस्थापन व दंडधारण

या प्रसंगी वरपक्षाकडील एखाद्या पुरुषाने पाण्याने भरलेली घागर (कळशी) घेऊन यज्ञकुंडाची प्रदक्षिणा करून कुंडाच्या दक्षिणेकडे कलश ठेवून उत्तराभिमुख बसावे. तसेच वराकडील दुसऱ्या पुरुषाने हातात दंड (लाठी किंवा काठी) घेऊन कुंडाच्या दक्षिणेकडे उत्तराभिमुख बसावे.

या दोघांना यज्ञसमाप्तीपर्यंत बसावे लागते. यज्ञप्रदक्षिणेच्या प्रसंगी वधू-वरांच्या पाठीमागे कलश व दंडासह प्रदक्षिणा करावी लागते. असे करण्यात प्राचीन काळी फार दूरदृष्टी व सतकर्ता दाखविलेली आहे. काही अविचारी, विघ्नसंतोषी किंवा शत्रू यज्ञस्थळी उपस्थित राहून विवाहात बाधा आणण्याची शक्यता नाकारता येत नाही. अशा प्रसंगी योग्य त्या संरक्षणासाठी 'दंड' अत्यावश्यक आहे. यज्ञपरिक्रमा करताना नवीन कपड्यांना अग्निस्पर्शाचा धोकाही होण्याचा संभव असतो. यासाठी अग्निशामक म्हणून पाण्याचा कलशदेखील तितकाच उपयोगी ठरतो.

ह्या वेळी वधूच्या सख्ख्या भावाने किंवा चुलतभावाने किंवा मामेभावाने किंवा मावसभावाने एका सुपात शमी वृक्षाची (आपट्याची /समदडीची) वाळलेली पाने मिसळलेल्या चार ओंजळी लाजा (पूजेच्या लाह्या) घेऊन पश्चिमभागी पूर्वाभिमुख बसावे. तसेच कार्यकर्त्यांनी एक शिला (चापट, लहान काळा दडग) व वधू-वरास बसण्यासाठी दोन कुशासने (दर्भासने) किंवा यज्ञीय तृणासने किंवा यज्ञीय वृक्षांच्या सालीची आसने यज्ञकुंडाच्या पश्चिमभागी ठेवावीत.

## वधू-वरांच्या प्रतिज्ञा

यांनतर **वधू-वरांनी** उत्तम वस्त्रालंकारानी आभूषित होऊन यज्ञमंडपात प्रवेश करावा व खालील मंत्र म्हणावा.

**ओं समञ्जन्तु विश्वे देवाः समापो हृदयानि नौ ।**

**सं मातरिश्वा सं धाता समुदेष्ट्री दधातु नौ।।** ऋ.१०/८५/४७

**भावार्थः-** "ह्या यज्ञमंडपात जमलेल्या सभ्यजन हो! आपण हे जाणून घ्यावे की, आम्ही दोघे प्रसन्नतापूर्वक गृहस्थाश्रमात प्रविष्ट होण्यासाठी एकदुसऱ्याचा स्वीकार करत आहोत. आम्हा दोघांची हृदये पवित्र, निर्मळ, शांत व शीतल जलाप्रमाणे एकमेकात विलीन झाली आहेत. ज्याप्रमाणे आपणांस प्राणवायू प्रिय असतो, त्याप्रमाणे आम्ही परस्परांना प्रिय होऊन राहूत. परमेश्वराने जसे या सृष्टीला धारण केले आहे, आधार दिला आहे, तसे आम्ही एकदुसऱ्यांना आधार देऊत. वक्ता आणि श्रोता यांची जशी परस्परांवर प्रीती असते तशी आम्हा दोघांच्या हृदयात परस्परांविषयी दृढ प्रीती राहील.

**विवेचन :** वर-वधू दोन भिन्न कुटुंबांतून एकत्रित आलेले असतात. दोन वेगवेगळ्या गावांचे पाणी पात्रात एकत्रित केल्यानंतर त्या पात्रातील पाणी विभक्त करणे जसे अशक्य तद्वत वधू-वराची एकजीव झालेली हृदये जगातील कोणतीही शक्ती विभक्त करू शकणार नाही." किती आदर्श कल्पना आहे ही! आजकालचे प्रथम थातूरमातूर प्रेम, नंतर विवाह आणि मग घटस्फोट. याऐवजी विवाहोत्तर परस्परांवर प्रेम करावयास शिकणे, एवढेच नव्हे तर गृहस्थप्रेमाच्या वेदीवर परस्परांसाठी समर्पित होण्याचा संकल्प करणे, सदा सर्व काळासाठी एक होणे ह्याला तोड नाही. जगातल्या कोणत्याही विवाहपद्धतीत असा संस्कार पाहावयास मिळणार नाही. यात मूळ भावना दोन हृदयांचे मिलन ही आहे.

त्यानंतर **वरान** वधूचा उजवा हात उजव्या हाताने धरत म्हणावे -

**ओं यदैषि मनसा दूरं दिशोऽनुपवमानो वा।**

**हिरण्यपर्णो वैकर्णः स त्वा मन्मनसां करोतु असौ[१]।।**

- हे ......[१]! ज्याप्रमाणे पवित्र वायू, जलादींना तेजस्वी किरणांद्वारे ग्रहण करणारा सूर्य दूरच्या पदार्थांना व दिशांना प्राप्त होतो, त्याप्रमाणे तू प्रेमपूर्वक स्वेच्छेने मला प्राप्त झाली आहेस. तो परमेश्वर तुला माझ्या मनाच्या अनुकूल करो.

यानंतर **वरान** खालील मंत्र म्हणावेत -

**ओं भूर्भुवः स्वः। अघोरचक्षुरपतिघ्न्येधि शिवा पशुभ्यःसुमना सुवर्चाः वीरसूर्देवृकामा स्योना शन्नो भव द्विपदे शं चतुष्पदे।।**

**ऋ.१०/८५/४४**

**ओं भुर्भूवः स्वः। सा नः पूषा शिवतमामैरय सा न ऊरू उशती विहर । यस्यामुशन्तः प्रहराम शेफं यस्यामु कामा बहवो निविष्ट्यै ।।**

**पार. ।१।४।१६।।**

– हे वरानने! तू पतीला विरोध न करणारी हो. प्राणदात्या, दुःखविनाशक, सुखस्वरूप परमेश्वराच्या कृपेने तू प्रेमळ दृष्टी असणारी हो. सर्वांचे मंगल करणारी, सर्व पशूंना सुख देणारी, पवित्र अंतःकरणाने युक्त असलेली, शुभ गुणकर्मस्वभावाने युक्त वीरांना जन्म देणारी, नियोगेच्छ, सुखयुक्त होऊन आम्हां मनुष्यांना व गाय वगैरे पशूंनाही सुख देणारी हो. मीही त्याप्रमाणेच वर्तन करीन.

हे देवी! परमपिता परमात्मा तुला माझे कल्याण करणारी बनवो. ज्यामुळे आपण दोघे श्रेष्ठ संतान उत्पन्न करण्यात सफल व्हावे आणि सुखाने गृहस्थजीवन घालवावे.

वराने वरील मंत्र म्हटल्यानंतर वधू-वराने यज्ञकुंडाची प्रदक्षिणा करून

---

१. 'असौ' पदाच्या जागी कन्येच्या नावाचा उच्चार करावा.

१. रिकाम्या जागी कन्येचे नाव मराठी व्याकरणाप्रमाणे संबोधन -एकवचनात उच्चारावे. उदा.'सुखदा' नाव असेल तर 'हे सुखदे!' याप्रमाणे.

यज्ञकुंडाच्या पश्चिमेस ठेवलेल्या आसनांवर बसावे. **वधूने** वराच्या उजव्या बाजूस बसावे व पुढील मंत्र म्हणावा –

**ओं प्र मे पतियानः पन्था कल्पतांँ्।**
**शिवा अरिष्टा पतिलोकं गमेयम्।।** मंत्रब्राह्मण १।१।८।।

- हे सर्वव्यापक परमेश्वरा ! तुझ्या कृपेने येथून पुढे पतीचा धर्माचरणाचा मार्गच विशेषत्वाने माझा जीवनमार्ग बनावा. मी सुखी, प्रसन्न आणि दुःखरहित होऊन पतीच्या घरी जाईन.

## सामान्य यज्ञ

**पुरोहिताची नियुक्ती :** वधूच्या किंवा वराच्या आई-वडिलांकडून पुरोहिताची नियुक्ती केली जाते. वधूच्या घरी विवाह असल्यास वधूचे आई-वडील व वराकडे विवाह असल्यास वराचे आई-वडील यजमान असतात.

यजमानाने खालीलप्रमाणे पुरोहिताची नियुक्ती करावी -

**यजमान - ओमावसोः सदने सीद।**

– ओंकाराचे स्मरण करून मी आपणास विनंती करीत आहे की, आपण यज्ञाच्या शुभासनावर कार्यसमाप्तीपर्यंत विराजमान व्हावे.

**पुरोहित - ओं सीदामि।** - मी बसतो.

असे म्हणून पुरोहिताने यज्ञकुंडाच्या दक्षिणेस उत्तराभिमुख बसावे.

**यजमान - अहम् अद्य मम पुत्रस्य / पुत्र्याः विवाहसंस्कारकर्मकरणाय भवन्तं वृणे।**

– मी माझ्या मुलाचा / मुलीचा विवाहसंस्कार करण्यासाठी आपली नियुक्ती करत आहे.

**पुरोहित - वृतोऽस्मि।** - मी स्वीकार करत आहे.

(महर्षी दयानंदकृत 'संस्कारविधी'त संकल्पपाठाचा उल्लेख नाही. ज्यांना संकल्पपाठ घेणे योग्य वाटेल त्यांनी तो खालीलप्रमाणे घ्यावा.)

## संकल्पपाठ

यजमान- ओम् तत्सत् श्रीब्रह्मणो द्वितीयप्रहरार्द्धे वैवस्वतमन्वन्तरेऽष्टाविंशतितमे कलियुगे कलिप्रथमचरणेऽमुक .... संवत्सरे ..... अयने ..... ऋतौ ....... मासे ....... पक्षे ...... तिथौ ...... दिवसे ..... नक्षत्रे ....... लग्ने ........ मुहूर्ते ....... जम्बूद्विपे भरतखण्डे आर्यावर्त्तैकदेशान्तर्गते ..... प्रान्ते ...... जनपदे ...... नगरे ...... स्थाने अहं स्वपुत्रस्य/पुत्र्याः विवाहसंस्कारकर्मकरणाय भवन्तं वृणे।

पुरोहित - वृतोऽस्मि ।

पुरोहित नियुक्तीनंतर प्रमुख विधीस प्रारंभ करावा. पुरोहित, वर-वधू आणि कार्यकर्ता यांनी खालीलप्रमाणे आचमन व अंगस्पर्श करावा.

## आचमन

ओम् अमृतोपस्तरणमसि स्वाहा ।।१।।

ओम् अमृतापिधानमसि स्वाहा ।।२।।

ओं सत्यं यशः श्रीर्मयि श्रीःश्रयतां स्वाहा।।३।।

## अंगस्पर्श

डाव्या तळहातात पाणी घेऊन अंगस्पर्श करावा.

ओं वाङ्मआस्येऽस्तु ।। मुखाला

ओं नसोर्मे प्राणोऽस्तु।। दोन्ही नाकपुड्यांना

ओम् अक्ष्णोर्मे चक्षुरस्तु ।। दोन्ही डोळ्यांना

ओं कर्णयोर्मे श्रोत्रमस्तु ।। दोन्ही कानांना

ओं बाह्वोर्मे बलमस्तु ।। दोन्ही बाहूंना

ओम् ऊर्वोर्म ओजोऽस्तु ।। दोन्ही मांड्यांना

ओम् अरिष्टानि मेऽङ्गानि तनूस्तन्वा मे सह सन्तु।। शरीराच्या सर्व अवयवांवर पाणी शिंपडावे.

## यज्ञोपवीत

हा विधी पूर्ण करण्यासाठी 'यज्ञोपवीत' (जानवे) धारण करणे महत्त्वाचे आहे. वधू-वराने **यापूर्वीच यज्ञोपवीत धारण केलेले असेल तर नव्याने ते धारण करण्याची गरज नाही.** यज्ञोपवीत हे धर्म व संस्कृतीचे प्रतीक तर आहेच शिवाय हे एक संकल्पसूत्रदेखील आहे. हे सूत्र धारण करणे म्हणजे देवऋण, ऋषिऋण व पितृऋण या ऋणांतून मुक्त होण्याचा संकल्प करणे होय. हा संकल्प जे करतात त्यांनाच यज्ञ करण्याचा अधिकार असतो म्हणून यज्ञारंभ करण्यापूर्वी विधिवत यज्ञोपवीत धारण करविले जावे व नंतरच यज्ञास सुरुवात करावी.

## यज्ञोपवीत धारण करण्याचा मंत्र

**ओं यज्ञोपवीतं परमं पवित्रं प्रजापतेर्यत्सहजं पुरस्तात्।**
**आयुष्यमग्र्यं प्रतिमुञ्च शुभ्रं यज्ञोपवीतं बलमस्तु तेजः।।**
**यज्ञोपवीतमसि यज्ञस्य त्वा यज्ञोपवीतेनोपनह्यामि।।**

हा मंत्र म्हणून यज्ञोपवीत धारण करावे व खालील मंत्र म्हणावेत –

## ईश्वरस्तुतिप्रार्थनोपासना मंत्र

**ओ३म् विश्वानि देव सवितर्दुरितानी परासुव।**
**यद् भद्रं तन्नऽआ सुव ।।१।।** यजु.३०।३

हे सकल जगतकर्ता प्रभो! समग्र ऐश्वर्ययुक्त, शुद्धस्वरूप, सुखदात्या परमेश्वरा! आपण कृपा करून आमच्यातील संपूर्ण दुर्गुण, दुर्व्यसने व दुःखे दूर करा आणि जे कल्याणकारक गुण, कर्म, स्वभाव व पदार्थ आहेत, ते आम्हांला प्रदान करा.

**हिरण्यगर्भः समवर्त्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ।।**
**स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम।।२।।**

यजु.१३।४।।

जो स्वप्रकाशस्वरूप असून ज्याने प्रकाशोत्पादक सूर्यचन्द्रादी पदार्थ

निर्माण करून त्यांना धारण केले आहे, या उत्पन्न झालेल्या संपूर्ण सृष्टीचा एकच चेतनस्वरूप असा जो अखिल ब्रह्मांड उत्पन्न होण्यापूर्वी विद्यमान होता व आजही ह्या भूमीचे आणि सूर्यादिकांचे धारण करतो, आम्ही सर्वांनी त्या सुखस्वरूप, शुद्ध परमेश्वराच्या प्राप्तीसाठी योग्य तो योगाभ्यास करावा व अत्यंत प्रेमाने त्याची विशेष भक्ती करावी.

**य आत्मदा बलदा यस्य विश्व उपासते प्रशिषं यस्य देवाः।**
**यस्य छायाऽमृतं यस्य मृत्युः कस्मै देवाय हविषा विधेम।।३।।**

**यजु.२५।१३।।**

जो आत्मज्ञानाचा दाता, शारीरिक, आत्मिक व सामाजिक बलदाता आहे, ज्याची सर्व विद्वान लोक उपासना करतात, ज्याच्या प्रत्यक्ष सत्यस्वरूप शासनापुढे, न्यायापुढे म्हणजेच शिक्षा-दंडादींपुढे मस्तक नम्र करणेच भाग पडते, ज्याचा कृपाश्रय हाच सुखदायक मोक्ष आहे, ज्याची अवज्ञा करणे, भक्ती न करणे म्हणजेच मृत्यू वगैरे दुःखाची सामग्री आहे, अशा त्या परमेश्वराची आम्ही सुखस्वरूप, सकल ज्ञानदायक ब्रह्मप्राप्तीकरिता आत्मा व अंतःकरणपूर्वक भक्ती करावी, म्हणजेच त्याचे आज्ञापालन करण्यास तत्पर राहावे.

**यः प्राणतो निमिषतो महित्वैक इन्द्राजा जगतो बभूव।**
**य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ।।४।।**

**यजु. २३।३।।**

जो ह्या चेतनस्वरूप जगाचा आपल्या अनंत महिम्याने युक्त एकच एक सत्ताधीश असा राजा विराजमान आहे, जो ह्या मनुष्यादी व गाय वगैरे सर्व प्राण्यांच्या शरीरांची रचना करतो, अशा त्या सुखस्वरूप सकल ऐश्वर्यदात्या प्रभूची आम्ही आपल्याजवळ असलेली सर्व उत्तम सामग्री त्याच्या आज्ञापालनात समर्पित करून त्याची विशेष भक्ती करावी.

**येन द्यौरुग्रा पृथिवी च दृढा येन स्वः स्तभितं येन नाकः।**
**योऽअन्तरिक्षे रजसो विमानः कस्मै देवाय हविषा विधेम।।५।।**

**यजु.३२।६।।**

ज्या परमेश्वराने तीक्ष्ण स्वभावाचा सूर्य आणि भूमीचे धारण केले आहे, ज्याने सुख धारण केले आहे, ज्याने दुःखरहित मोक्षाचे धारण केले आहे व जो आकाशात पक्षी विचरतात त्याप्रमाणे संपूर्ण लोकलोकांतरे निर्माण करून, मानवसृष्टी उत्पन्न करून सर्वाठायी भ्रमण करतो, त्याची आम्ही सुखदायक, कामना करण्यायोग्य परब्रह्मप्राप्तीकरिता सर्व सामर्थ्य एकटवून विशेष भक्ती करावी.

**प्रजापते नं त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परिता बभूव।**
**यत्कामास्ते जुहुमस्तन्नोऽअस्तु वयं स्याम पतयो रयीणाम्।।६।।**

**ऋ.१०।१२१।१०।।**

हे अखिल प्रजेच्या स्वामी! आपणाहून भिन्न दुसरा कोणीही त्या किंवा ह्या सर्व उत्पन्न झालेल्या जडचेतनादिकांचा तिरस्कार करू शकत नाही अर्थात आपणच सर्वोच्च सर्वश्रेष्ठ आहात. ज्या-ज्या पदार्थाच्या कामनेने आम्ही भक्ती करतो, आपला आश्रय घेतो, इच्छा करतो, ती-ती कामना पूर्ण होवो. जेणेकरून आम्ही धन-ऐश्वर्याचे स्वामी बनावे.

**स नो बन्धुर्जनिता स विधाता धामानि वेद भुवनानि विश्वा।**
**यत्र देवाऽअमृतमानशानास्तृतीये धामन्नध्यैरयन्त।।७।।** **यजु.३२।१०।।**

हे मनुष्यांनो! तो परमात्मा आपणा सर्वांना भावाप्रमाणे सुखदायक आहे. सकल जगाचा उत्पादक आहे. तोच सर्व कामना पूर्ण करणारा, सर्व लोकांतरांचे ज्ञान बाळगणारा आहे. ज्यायोगे सांसारिक सुख-दुःखरहित, नित्यानंदयुक्त, मोक्षस्वरूप धारण करणारा परमात्मा आपला गुरू, आचार्य, राजा व न्यायाधीश आहे. आपण सर्वांनी मिळून त्याची सदैव भक्ती करावी.

**अग्ने नय सुपथा राये अस्मान् विश्वानि देव वयुनानि विद्वान्।**
**युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमऽउक्तिं विधेम ।।८।।**

**यजु.४०।१६।।**

हे स्वप्रकाशस्वरूप, ज्ञानस्वरूप, सर्व जगाला प्रकाश देणाऱ्या सकल सुखदात्या परमेश्वरा! आपण कृपा करून आम्हांला विज्ञान आणि राज्यादी

ऐश्वर्याच्या प्राप्तीसाठी उत्तम धर्मयुक्त आप्त लोकांच्या मार्गाने संपूर्ण प्रज्ञान व उत्तम कर्म प्राप्त करून द्या आणि आम्हांपासून कुटिलतायुक्त पापरूपी कर्मांना दूर करा. आम्ही नम्रतापूर्वक आपली पुष्कळ प्रकारे स्तुती, प्रशंसा सदोदित करू आणि आनंदात राहू.

## अग्न्याधान

खालील मंत्राने कापराने अग्नी पेटवावा.

**ओं भूर्भुवः स्वः।** गोभि.प्र.१।खं.१।सू.११।।

खालील मंत्र म्हणत पेटवलेला अग्नी यज्ञकुंडात ठेवावा.

**ओं भूर्भुवः स्वर्द्यौरिव भूम्ना पृथिवीव वरिम्णा।**
**तस्यास्ते पृथिवि देवयजनि पृष्ठेऽग्निमन्नादमन्नाद्यायादधे।।**

यजु.३।५।।

खालील मंत्र म्हणत अग्नी प्रदीप्त करावा.

**ओम् उद्बुध्यस्वाग्ने प्रतिजागृहि त्वमिष्टापूर्ते सँ्सृजेथामयं च।**
**अस्मिन्त्सधस्थेऽअध्युत्तरस्मिन् विश्वेदेवा यजमानश्च सीदत।।**

यजु.१५।५४।।

## समिधाधान

खालील मंत्रांनी एक-एक समिधा यज्ञकुंडात ठेवावी.

**ओम् अयन्त इध्म आत्मा जातवेदस्तेनेध्यस्व वर्धस्व चेद्धवर्द्धय चास्मान् प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन समेधय स्वाहा ।। इदमग्नये जातवेदसे इदन्न मम।।१।।** पहिली समिधा

**ओं समिधाग्निं दुवस्यत घृतैर्बोधयतातिथिम् । आस्मिन् हव्या जुहोतन स्वाहा।। इदमग्नये- इदन्न मम ।।२।।**

**ओं सुसमिद्धाय शोचिषे घृतं तीव्रं जुहोतन। अग्नये जातवेदसे स्वाहा। इदमग्नये जातवेदसे - इदन्न मम।।३।।**

या दोन मंत्रांनी दुसरी समिधा

**ओं तन्त्वा समिद्भिरङ्गिरो घृतेन वर्द्धयामसि। बृहच्छोचा यविष्ठ्य स्वाहा। इदमग्नयेऽङ्गिरसे इदन्न मम।।४।।** तिसरी समिधा **यजु.३।१-३।।**

यानंतर खालील मंत्र पाच वेळा म्हणत तुपाच्या पाच आहुती द्याव्यात.

**ओम् अयन्त इध्म आत्मा जातवेदस्तेनेध्यस्व वर्धस्व चेद्धवर्द्धय चास्मान् प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन समेधय स्वाहा ।। इदमग्नये जातवेदसे इदन्न मम।।**

## जलप्रसेचन

त्यानंतर ओंजळीत पाणी घेऊन वेदीच्या चारी दिशांना सोडावे.

**ओम् अदितेऽनुमन्यस्व।।** पूर्व

**ओम् अनुमतेऽनुमन्यस्व।।** पश्चिम

**ओं सरस्वत्यनुमन्यस्व ।।** उत्तर आणि

**ओं देव सवितः प्रसुव यज्ञं प्रसुव यज्ञपतिं भगाय।**

**दिव्यो गन्धर्वः केतपूः केतं नः पुनातु वाचस्पतिर्वाचं नः स्वदतु।।**

**यजु.३०।१।।**

ह्या मंत्राने वेदीच्या चारी बाजूस पाणी सोडावे.

यानंतर खालील मंत्रांनी आहुती द्याव्यात.

## आघारावाज्यभागाहुती

**ओम् अग्नये स्वाहा। इदमग्नये इदन्न मम।।** वेदीच्या उत्तरभागी

**ओम् सोमाय स्वाहा। इदं सोमाय इदन्न मम।।** वेदीच्या दक्षिणभागी

**ओम् प्रजापतये स्वाहा। इदं प्रजापतये इदन्न मम।।**

**ओम् इन्द्राय स्वाहा। इदमिन्द्राय इदन्न मम।।**

या दोन्ही मंत्रांनी वेदीच्या मध्यभागी दोन आहुत्या द्याव्यात.

## व्याहृत्याहुती

**ओं भूरग्नये स्वाहा।। इदमग्नये इदन्न मम।।**

**ओं भुवर्वायवे स्वाहा।। इदं वायवे इदन्न मम।।**

ओं स्वरादित्याय स्वाहा।। इदमादित्याय-इदन्न मम।।
ओं भूर्भुवःस्वरग्निवाय्वादित्येभ्यः स्वाहा।।
इदमग्निवाय्वादित्येभ्यः - इदन्न मम।। गोभिल ।१।८।१५।।
ह्या चार तुपाच्या आहुती द्याव्यात.

## अष्टाज्याहुती

ओं त्वं नोऽअग्ने वरुणस्य विद्वान् देवस्य हेळोऽव यासिसीष्ठाः। यजिष्ठो वह्नितमः शोशुचानो विश्वा द्वेषांसि प्र मुमुग्ध्यस्मत् स्वाहा। इदमग्निवरुणाभ्याम् इदन्न मम।।१।। ऋ.४।१।४।।

ओं स त्वं नो अग्नेऽवमो भवोती नेदिष्ठोऽअस्या उषसो व्युष्टौ। अव यक्ष्व नो वरुणं रराणो वीहि मृळीकं सुहवो न एधि स्वाहा।। इदमग्निवरुणाभ्याम् इदन्न मम।।२।। ऋ.४।१।५।।

ओम् इमं मे वरुण श्रुधी हवमद्या च मृळय। त्वामवस्युराचके स्वाहा।। इदं वरुणाय - इदन्न मम।।३।। ऋ.१।२५।१९।।

ओं तत्त्वा यामि ब्रह्मणा वन्दमानस्तदा शास्ते यजमानो हविर्भिः। अहेळमानो वरुणेह बोध्युरुशंस मा न आयुः प्र मोषीः स्वाहा।। इदं वरुणाय - इदन्न मम।।४।। ऋ.१।२४।११।।

ओं ये ते शतं वरुण ये सहस्रं यज्ञिया पाशा वितता महान्तः। तेभिर्नोऽअद्य सवितोत विष्णुर्विश्वे मुञ्चन्तु मरुतः स्वर्काः स्वाहा।। इदं वरुणाय सवित्रे विष्णवे विश्वेभ्यो देवेभ्यो मरुद्भ्यः स्वर्केभ्यः इदन्न मम।। ५।।
कात्या. श्रौत. २५।१।११।।

ओम् अयाश्चाग्नेऽस्यनभिशस्तिपाश्च सत्यमित्त्वमया असि। अया नो यज्ञं वहास्यया नो धेहि भेषजँ् स्वाहा।। इदमग्नये अयसे इदन्न मम ।।६।।
कात्या. श्रौत. २५।१।११।।

ओम् उदुत्तमं वरुण पाशमस्मदवाधमं वि मध्यमं श्रथाय। अथा

वयमादित्य व्रते तवानागसो अदितये स्याम स्वाहा।। इदं वरुणायऽऽदित्यायाऽदितये च इदन्न मम ।। ७।। ऋ.१।२४।१५।।

ओं भवतन्नः समनसौ सचेतसावरेपसौ। मा यज्ञ ँ् हि ँ् सिष्टं मा यज्ञपतिं जातवेदसौ शिवौ भवतमद्य नः स्वाहा।। इदं जातवेदोभ्याम् - इदन्न मम ।।८।। यजु.५।३।।

## प्रधान होम

हा प्रधान होम करताना वधूने आपला उजवा हात वराच्या उजव्या खांद्यावर ठेवावा, वराने खालील मंत्राने तुपाच्या पाच आहुती द्याव्यात.

ओं भूर्भुवः स्वः। अग्न आयूंषि पवस आ सुवोर्जमिषं च नः। आरे बाधस्व दुच्छुनां स्वाहा।। इदमग्नये पवमानाय-इदन्न मम ।।१।।

ओं भूर्भुवः स्वः। अग्निर्ऋषिः पवमानः पाञ्चजन्यः पुरोहितः। तमीमहे महागयं स्वाहा।। इदमग्नये पवमानाय - इदन्न मम ।।२।।

ओं भूर्भुवः स्वः। अग्ने पवस्व स्वपा अस्मे वर्चः सुवीर्यम् दधद्रयिं मयि पोषं स्वाहा।। इदमग्नये पवमानाय - इदन्न मम।।३।।

ऋ.९।६६।१९-२१।।

ओं भूर्भवः स्वः। प्रजापते न त्वदेतान्यनो विश्वाजातानि परि ता बभूव। यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणां स्वाहा।। इदं प्रजापतये इदन्न मम ।।४।। ऋ.१०।१२१।१०।।

ओं भूर्भुवः स्वः। त्वमर्यमा भवसि यत्कनीनां नाम स्वधावन्गुह्यं बिभर्षि। अञ्जन्ति मित्रं सुधितं न गोभिर्यद्दम्पती समनसा कृणोषि स्वाहा।। इदमग्नये - इदन्न मम।।

यानंतर राष्ट्रभृतहोम सुरू करावा.

## राष्ट्रभृतहोम

**विवेचन :-** गृहस्थाश्रमात प्रविष्ट झाल्यावर नवविवाहितांना अनेक कर्तव्ये पार पाडावी लागतात. राष्ट्राचे भरण-पोषण करत राष्ट्राला दृढ व शक्तिशाली

आणि समुन्नत बनवणे हे प्रत्येक गृहस्थीचे कर्तव्य आहे. राष्ट्रभृत यज्ञातील मंत्रांमध्ये अग्नी, सूर्य, चंद्र, वायू, यज्ञ आणि मन यांना 'गंधर्व' म्हटले आहे. हे सर्व या विश्वाला वेगवेगळ्या स्वरूपात धारण करतात. ह्या सर्वांनी आमच्या ब्रह्मशक्तीचे आणि क्षात्रशक्तीचे रक्षण करावे अशी प्रार्थना केली आहे. बौद्धिक, मानसिक व आध्यात्मिक शक्ती ही ब्राह्मशक्ती असून शारीरिक शक्ती, आधिभौतिक शक्ती ही क्षात्रशक्ती आहे. ब्राह्मशक्ती व क्षात्रशक्तींमुळेच समाज व राष्ट्र टिकून राहते.

**ओम् ऋताषाड् ऋतधामाग्निर्गन्धर्वः। स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट्।। इदमृताषाहे ऋतधाम्नेऽग्नये गन्धर्वाय इदन्न मम।।१।।**

**ओम् ऋताषाड् ऋतधामाग्निर्गन्धर्वस्तस्यौषधयोऽप्सरसो मुदो नाम। ताभ्यः स्वाहा।। इदमोषधिभ्योऽप्सरोभ्यो मुद्भ्यः इदन्न मम ।।२।।**

**ओं सँ्हितो विश्वसामा सूर्यो गन्धर्वः। स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट्।। इदं सँ्हिताय विश्वसाम्ने सूर्याय गन्धर्वाय इदन्न मम ।।३।।**

**ओं सँ्हितो विश्वसामा सूर्यो गन्धर्वस्तस्य मरीचयोऽप्सरस आयुवो नाम । ताभ्य स्वाहा । इदं मरीचिभ्योऽप्सरोभ्य आयुभ्यः - इदन्न मम ।।४।।**

**ओं सुषुम्णः सूर्यरश्मिश्चन्द्रमा गन्धर्वः। स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट्।। इदं सुषुम्णाय सूर्यरश्मये चन्द्रमसे गन्धर्वाय -इदन्न मम ।।५।।**

**ओं सुषुम्णः सूर्यरश्मिश्चन्द्रमा गन्धर्वस्तस्य नक्षत्राण्यप्सरसो भेकुरयो नाम। ताभ्यः स्वाहा।। इदं नक्षत्रेभ्योऽप्सरोभ्यो भेकुरिभ्यः - इदन्न मम ।।६।।**

**ओम् इषिरो विश्वव्यचा वातो गन्धर्वः। स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट्।। इदमिषिराय विश्वव्यचसे वाताय गन्धर्वाय-इदन्न मम।।७।।**

**ओम् इषिरो विश्वव्यचा वातौ गन्धर्वस्तस्यापो अप्सरस ऊर्ज्जो नाम। ताभ्यः स्वाहा ।। इदमद्भ्योऽप्सरोभ्यऽऊर्ग्भ्यः - इदन्न मम ।।८।।**

**ओं भुज्युःसुपर्णो यज्ञो गन्धर्वः। स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट्।। इदं भुज्यवे सुपर्णाय यज्ञाय गन्धर्वाय - इदन्न मम ।।९।।**

ओं भुज्युः सुपर्णो यज्ञो गन्धर्वस्तस्य दक्षिणा अप्सरस स्तावा नाम। ताभ्यः स्वाहा।। इदं दक्षिणाभ्योऽप्सरोभ्यः स्तावाभ्यः-इदन्न मम ।।१०।।

ओं प्रजापतिर्विश्वकर्मा मनो गन्धर्वः। स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट्।। इदं प्रजापतये विश्वकर्मणे मनसे गन्धर्वाय - इदन्न मम।।११।।

ओं प्रजापतिर्विश्वकर्मा मनो गन्धर्वस्तस्य ऋक्सामान्यप्सरस एष्टयो नाम । ताभ्यः स्वाहा ।। इदमृक्सामेभ्योऽप्सरोभ्यः एष्टिभ्यः - इदन्न मम ।।१२।।

## जयाहोम

**विवेचन :** आपले जीवन यशस्वी होण्यासाठी जयाहोम केला जातो. यात चित्त, चेतनाशक्ती, सत्यासत्य विवेक, संकल्प, संकल्पशक्ती, विज्ञान, मन, इंद्रिये, अमावस्या - पौर्णिमेसंबंधी कृत्ये, गौरव व उत्तम शरीर इत्यादींच्या प्राप्तीसाठी शुभसंकल्प करून या शक्तींचे आवाहन करून आहुती दिल्या जातात. ह्या गोष्टी आमच्यासाठी लाभदायक व्हाव्यात अशी प्रार्थना यात आहे. राष्ट्रीय उन्नती आणि वैयक्तिक उन्नती या दोन्हींमुळे व्यक्तीचे जीवन सफल होते.

ओं चित्तं च स्वाहा।। इदं चित्ताय - इदन्न मम ।।१।।
ओं चित्तिश्च स्वाहा।। इदं चित्त्यै - इदन्न मम ।।२।।
ओम् आकूतं च स्वाहा।। इदमाकूताय - इदन्न मम ।।३।।
ओम् आकूतिश्च स्वाहा।। इदमाकूत्यै - इदन्न मम ।।४।।
ओं विज्ञातं च स्वाहा।। इदं विज्ञाताय - इदन्न मम ।।५।।
ओं विज्ञातिश्च स्वाहा।। इदं विज्ञात्यै - इदन्न मम ।।६।।
ओं मनश्च स्वाहा।। इदं मनसे - इदन्न मम ।।७।।
ओं शक्वरीश्च स्वाहा।। इदं शक्वरीभ्यः - इदन्न मम ।।८।।
ओं दर्शश्च स्वाहा।। इदं दर्शाय - इदन्न मम ।।९।।
ओं पौर्णमासं च स्वाहा।। इदं पौर्णमासाय - इदन्न मम ।।१०।।
ओं बृहच्च स्वाहा।। इदं बृहते - इदन्न मम ।।११।।

ओं रथन्तरं च स्वाहा।। इदं रथन्तराय - इदन्न मम ।।१२।।
ओं प्रजापतिर्जयानिन्द्राय वृष्णो प्रायच्छदुग्रः पृतना जयेषु।
तस्मै विशः समनमन्त सर्वाः स उग्रः स इ हव्यो बभूव स्वाहा ।।
इदं प्रजापतये जयानिन्द्राय - इदन्न मम ।।१३।।

## अभ्यातन-होम

**विवेचन :** हा होम वैयक्तिक उन्नतीसाठी, व्यक्तीचा सर्व प्रकारचा विकास होण्यासाठी केला जातो. ह्यामध्ये विश्वातील अग्नी, इंद्र, वायू, सूर्य, चंद्र, समुद्र इत्यादी देवता, शक्ती, पदार्थ तसेच कुटुंबातील सर्व नातलग, इष्टमित्र, बंधु-बांधव आमचे रक्षक, प्रेरक व मार्गदर्शक बनावेत अशी प्रार्थना केली आहे.

व्यक्तीच्या विकासातच राष्ट्राचा विकास सामावलेला आहे. राष्ट्रातील नागरिक बलिष्ठ आणि चारित्र्यवान असतील तरच राष्ट्र बलशाली व विकसित होईल.

ओम् अग्निर्भूतानामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन् कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदमग्नये भूतानामधिपतये - इदन्न मम ।।१।।

ओम् इन्द्रो ज्येष्ठानामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदमिन्द्राय ज्येष्ठानामधिपतये - इदन्न मम ।।२।।

ओं यमः पृथिव्याऽअधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा ।। इदं यमाय पृथिव्या अधपतये - इदन्न मम।।३।।

ओं वायुरन्तरिक्षस्याधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदं वायवे अन्तरिक्षस्याधिपतये - इदन्न मम ।।४।।

ओं सूर्यो दिवोऽधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन्

क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा ।। इदं सूर्याय दिवोऽधिपतये - इदन्न मम ।।५।।

ओं चन्द्रमा नक्षत्राणामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन्क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदं चन्द्रमसे नक्षत्राणामधिपतये - इदन्न मम ।।६।।

ओं बृहस्पतिर्ब्रह्मणोऽधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदं बृहस्पतये ब्रह्मणोऽधिपतये - इदन्न मम ।।७।।

ओं मित्रः सत्यानामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदं मित्राय सत्यानामधिपतये - इदन्न मम ।।८।।

ओं वरुणोऽपामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदं वरुणायापामधिपतये - इदन्न मम ।।९।।

ओं समुद्रः स्रोत्यानामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन्क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदं समुद्राय स्रोत्यानामधिपतये - इदन्न मम ।।१०।।

ओम् अन्नँसाम्राज्यानामधिपतिस्तन्मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन्क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदमन्नाय साम्राज्यानामधिपतये - इदन्न मम ।।११।।

ओं सोमऽऔषधीनामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।। इदं सोमाय ओषधीनामधिपतये - इदन्न मम ।।१२।।

ओं सविता प्रसवानामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन्क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्याँ स्वाहा।।

इदं सवित्रे प्रसवानामधिपतये - इदन्न मम ।।१३।।

ओं रुद्रः पशूनामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन्कर्मण्यस्यां देवहूत्या ँ् स्वाहा।। इदं रुद्राय पशूनामधिपतये - इदन्न मम ।।१४।।

ओं त्वष्टा रूपाणामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन् कर्मण्यस्यां देवहूत्या ँ् स्वाहा।। इदं त्वष्ट्रे रूपाणामधिपतये - इदन्न मम ।।१५।।

ओं विष्णुः पर्वतानामधिपतिः स मावत्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन् कर्मण्यस्यां देवहूत्या ँ् स्वाहा।। इदं विष्णवे पर्वतानामधिपतये - इदन्न मम ।।१६।।

ओं मरुतो गणानामधिपतयस्ते मावन्त्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन् कर्मण्यस्यां देवहूत्या ँ् स्वाहा।। इदं मरुद्भ्यो गणानामधिपतिभ्यः - इदन्न मम ।।१७।।

ओं पितरः पितामहाः परेऽवरे ततास्ततामहा इह मावन्त्वस्मिन् ब्रह्मण्यस्मिन् क्षत्रेऽस्यामाशिष्यस्यां पुरोधायामस्मिन् कर्मण्यस्यां देवहूत्या ँ् स्वाहा।। इदं पितृभ्यः पितामहेभ्यः परेभ्योऽवरेभ्यस्ततेभ्यस्ततामहेभ्यश्च - इदन्न मम ।।१८।।

## दुःखविमोचन होम

**विवेचन :** ह्या होमातील मंत्रामध्ये पुढील भावना व्यक्त केलेल्या आहेत. ही माझी पत्नी उत्तम पुत्रवती व्हावी. पुत्रासंबंधी कोणतीही दुःखे हिला न व्हावीत. हिची कूस पुत्ररहित न रहावी अर्थात हिच्या ठिकाणी वंध्यत्वदोष निर्माण न व्हावा. हिची मुले दीर्घायुषी व्हावीत ज्यामुळे हिला पुत्रप्राप्तीचा आनंद व्हावा. ईश्वरकृपेने आमच्या घरात रात्रीच्या वेळी कोंणता आर्त नाद - दुःखाचा शब्द ऐकू न यावा.

या होमात खालील मंत्रांनी तुपाच्या आहुत्या द्याव्यात.

ओम् अग्निरैतु प्रथमो देवतानाँ॒ सोऽस्यै प्रजां मुञ्चतु मृत्युपाशात्। तदयँ॒राजा वरुणोऽनुमन्यतां यथेयँ॒ स्त्री पौत्रमघन्न रोदात् स्वाहा।। इदमग्नये - इदन्न मम ।।१।।

ओम् इमामग्निस्त्रायतां गार्हपत्यः प्रजामस्यै नयतु दीर्घमायुः। अशून्योपस्था जीवतामस्तु माता पौत्रमानन्दमभिविबुध्यतामियँ॒ स्वाहा।। इदमग्नये - इदन्न मम ।।२।।

ओम् स्वस्ति नोऽग्ने दिवा पृथिव्या विश्वानि धेह्ययथा यजत्र। यदस्यां मयि दिवि जातं प्रशस्तं तदस्मासु द्रविणं धेहि चित्रँ॒ स्वाहा।। इदमग्नये - इदन्न मम ।।३।।

ओं सुगन्नु पन्थां प्रदिशन्न एहि ज्योतिष्मध्ये ह्यजरन्नऽ आयुः। अपैतु मृत्युरमृतं म आगाद् वैवस्वतो नोऽअभयं कृणोतु स्वाहा।। इदं वैवस्वताय - इदन्न मम ।।४।।

ओं परं मृत्योऽअनु परेहि पन्थां यत्र नोऽअन्य इतरो देवयानात्। चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मा नः प्रजाँ॒ रीरिषो मोत वीरान्त्स्वाहा।। इदं मृत्यवे - इदन्न मम ।।५।।

ओं द्यौस्ते पृष्ठँ॒रक्षतु वायुरूरू अश्विनौ च। स्तन्धयस्ते पुत्रान्त्सविताभिरक्षत्वावाससः परिधानाद् बृहस्पतिर्विश्वेदेवा अभिरक्षन्तु पश्चात् स्वाहा।। इदं विश्वेभ्यो देवेभ्यः - इदन्न मम ।।६।।

ओं मा ते गृहेषु निशि घोष उत्त्थादन्यत्र त्वद् रुदत्यः संविशन्तु। मा त्वँ॒ रुदत्युरऽआवधिष्ठा जीवपत्नी पतिलोके विराज पश्यन्ती प्रजाँ॒ सुमनस्यमानाँ॒ स्वाहा।। इदमग्नये - इदन्न मम ।।७।।

ओम् अप्रजस्यं पौत्रमर्त्यपाप्मानमुत वाऽअघम्। शीर्ष्णः स्त्रजमिवोन्मुच्य द्विषद्भ्यः प्रतिमुञ्चामि पाशँ॒ स्वाहा।। इदमग्नये - इदन्न मम ।।८।।

यानंतर व्याहृतिमंत्राने पुढीलप्रमाणे चार आहुती द्याव्यात.

## व्याहृत्याहुती

ओं भूरग्नये स्वाहा।। इदमग्नये इदन्न मम।।

ओं भुवर्वायवे स्वाहा।। इदं वायवे इदन्न मम।।

ओं स्वरादित्याय स्वाहा।। इदमादित्याय-इदन्न मम।।

ओं भूर्भुवःस्वरग्निवाय्वादित्येभ्यः स्वाहा।।

इदमग्निवाय्वादित्येभ्यः - इदन्न मम।। गोभिल ।१।८।१५।।

## पाणिग्रहण

**वराने** आपल्या आसनावरून उठून वधूच्या समोर पश्चिमाभिमुख उभे राहून डाव्या हाताने वधूचा उजवा हात धरून वर उचलावा. उजव्या हाताच्या तळहाताने वधूचा वर उचललेला तळहात धरून पुढील सहा मंत्र म्हणावेत.

ओं गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः।
भगो अर्यमा सविता पुरन्धिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः।।१।।

ऋग्वेद १०।८५।३६।।

ओं भगस्ते हस्तमग्रभीत् सविता हस्तमग्रभीत्।
पत्नी त्वमसि धर्मणाहं गृहपतिस्तव।।२।।
ममेयमस्तु पोष्या मह्यं त्वादाद् बृहस्पतिः।
मया पत्या प्रजावति सं जीव शरदः शतम् ।।३।।
त्वष्टा वासो व्यदधाच्छुभे कं बृहस्पतेः प्रशिषा कवीनाम्।
तेनेमां नारीं सविता भगश्च सूर्यामिव परि धत्तां प्रजया ।।४।।
इन्द्राग्नी द्यावापृथिवी मातरिश्वा मित्रावरुणा भगो अश्विनोभा।
बृहस्पतिर्मरुतो ब्रह्म सोम इमां नारीं प्रजया वर्धयन्तु ।।५।।

अथर्व. १४।१।५१-५४।।

अहं विष्यामि मयि रूपमस्या वेददित्पश्यन् मनसः कुलायम्।

न स्तेयमद्मि मनसोदमुच्ये स्वयं श्रथ्नानो वरुणस्य पाशान् ।।६।।

अथर्व.१४।१।५७।।

**भावार्थ :** हे देवी! ऐश्वर्य, सुसंतान प्राप्तीसाठी व सौभाग्य वृद्धिंगत करण्यासाठी मी तुझा हात हातात घेत आहे. तू वृद्धावस्थेपर्यंत माझ्याबरोबर सुखाने रहा. जगाचा उत्पादक परमात्मा व सभा मंडपात बसलेले विद्वान लोक यांनी गृहस्थाश्रमाकरिता तुला मला दिले आहे.

हे देवी! ऐश्वर्यशाली आणि धर्ममार्गात प्रवृत्त असलेला असा मी तुझा हात मी ग्रहण करीत आहे. तू धर्माने माझी पत्नी आहेस व मी धर्माने तुझा गृहपती (गृहस्वामी) आहे.

हे अनघे! परमात्याने तुला, मला दिलेले आहे. माझे पालन-पोषण करण्याला तू योग्य पत्नी आहेस. तू माझ्याबरोबर सुखपूर्वक शंभर वर्षे जगण्याची कामना करीत उत्तम संतानवती होऊन जीवन धारण कर.

हे वरानने! परमात्म्याच्या या सृष्टीत आपण ज्ञानी जनांप्रमाणे आपले जीवन व्यतीत करू. तू सुंदर वस्त्राभूषणांनी सुशोभित होऊन ढगातील चमकणाऱ्या विजेप्रमाणे माझ्या चित्तास प्रसन्न कर. परमेश्वर तुला प्रजेने युक्त करो - संतती देवो. मी सूर्यकिरणांप्रमाणे तुला नेहमी वस्त्राभूषणांनी सुशोभित ठेवीन.

आपण सदैव आनंद, ऐश्वर्य आणि प्रजावृद्धी करू. दोघे परस्पर मिळून गृहस्थाश्रम सुखी व संपन्न बनवू.

हे कल्याणी! कुलाची वृद्धी पाहणारा मी तुझ्या रूपास प्राप्त होत आहे. (तुझ्या रूपात मी स्वतःचे रूप पाहत आहे.) तू सुद्धा प्रेमपूर्वक माझ्यात विलीन होऊन माझ्याशी अनुकूल व्यवहार कर. मी मनानेही तुझ्याशी चोरीचे आचरण करणार नाही. काही लपवून ठेवणार नाही. तुला चोरून काही खाणार नाही. पुरुषार्थाने शिथिल होऊनसुद्धा मी संकटांना दूर करीन. तूसुद्धा माझ्याशी असेच आचरण कर.

**विवेचन :** संस्कृतमध्ये हाताला 'पाणि' म्हणतात. पाणिग्रहण म्हणजे हात

धरणे, हात हातात घेणे (हस्तबंध) अर्थात स्वीकार करणे. 'हस्तबंध' ह्या शब्दापासून 'हसबंड' हा शब्द बनला आहे. गृहस्थजीवनाच्या उंबरठ्यावर उभ्या असलेल्या वधूवरांना गृहस्थजीवनाची ओळख होणे, संभाव्य समस्यांचे स्वरूप लक्षात येणे जरुरीचे असते. संसारसागरातील वादळांचे स्वरूप व ते पार करून जाण्याचे उपाय जर आधीच सांगण्यात आले तर उभयतांची जीवननौका आनंदपूर्वक संसारसागर पार करू शकेल.

केवळ वाग्दान झाले आणि पाणिग्रहण झाले नाही अथवा केवळ पाणिग्रहण झाले आणि वाग्दान झाले नाही तर अशा अवस्थेत स्त्रीपुरुषाचा संबंध अनैतिक व अवैध मानला जातो. म्हणून वाग्दानाबरोबरच पाणिग्रहणाचा विधी झाल्यावरच कन्या गृहिणीपदाला व वर गृहस्थीपदाला प्राप्त होतो.

ह्या प्रतिज्ञा खऱ्या अर्थाने गृहस्थाश्रमात जीव ओतणाऱ्या आहेत. गृहस्थाश्रमात खरा क्लेश परस्परांचा सल्ला, विचारविनिमय न केल्याने व बाहेरख्याली होण्याने होत असतो.

पाणिग्रहणाचे सहा मंत्र म्हटल्यावर वराने वधूचा हात धरून तिला उठवावे व **यज्ञकुंडाला प्रदक्षिणा** घालून पूर्वीप्रमाणे स्थानापन्न व्हावे. या वेळी कलश (घागर) घेऊन बसलेल्या पुरुषानेही घागर खांद्यावर घेऊन वधू-वराच्या मागे चालावे. नंतर **वधू-वराने** खालील मंत्राने प्रतिज्ञा करावी-

### प्रतिज्ञामंत्र

**ओम् अमोऽहमस्मि सा त्वँ सा त्वमस्यमोऽहम्। सामाहस्मि ऋक्त्वं द्यौरहं पृथिवी त्वं तावेव विवहावहै सह रेतो दधावहै। प्रजां प्रजनयावहै पुत्रान् विन्दावहै बहून्। ते सन्तु जरदष्टयः संप्रियौ रोचिष्णू सुमनस्यमानौ। पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतँ शृणुयाम शरदः शतम् ।।७।।**

**पार. १।६।३।।**

**भावार्थः-** हे वधू! मी ज्ञानपूर्वक तुझा हात ग्रहण करत आहे, तूपण तसेच ज्ञानपूर्वक माझा हात धर. मी सामवेदासमान व तू ऋग्वेदासमान आहेस. तू

पृथ्वीसमान आहेस आणि मी सूर्यासमान आहे. आपण प्रसन्नतेने विवाह करूत. आपण दोघे उत्तम संतानांना जन्म देऊत. ही मुले वृद्धावस्थेपर्यंत जीवनयुक्त राहोत. उत्तम प्रकारांनी एक-दुसऱ्याशी प्रसन्न, रुचियुक्त, शुभमनाने शंभर वर्षे जीवन जगणारे, एक-दुसऱ्याशी प्रेमदृष्टीने पाहणारे व प्रियवचन बोलणारे राहोत.

## शिलारोहण

नंतर वधूच्या भावाने उजव्या हाताने वधूचा उजवा पाय उचलून शिलेवर ठेवावा. आणि त्या वेळी **वराने** म्हणावे -

**ओम् आरोहेममश्मानमश्मेव त्वं स्थिरा भव।**

**अभितिष्ठ पृतन्यतोऽवबाधस्व पृतनायतः ।।१।।** पार.१।७।१।।

- हे देवी! तू ह्या शिळेवर चढ आणि धर्मकार्याच्या बाबतीत ह्या शिळेप्रमाणे खंबीर बन. ज्याप्रमाणे ही शिळा मुसळधार पावसाचे व वादळाचे आघात सोसूनही दृढ राहते, त्याप्रमाणे तू गृहस्थ जीवनात कधी वाईट प्रसंग किंवा संकटे आल्यास स्थिर राहा.

**विवेचन :** शिळा ही कठोरतेचे प्रतीक आहे. जेव्हा कोणी एखाद्याचे पाय धरतो तेव्हा त्याची लाज-अब्रू ज्याचे पाय धरले जातात त्याच्या हातात असते. वधूचा भाऊ वधूला म्हणतो, "पहा तुझ्या भावी जीवनात अनेक समस्या येतील. दोन भिन्न परिवारांत वाढलेल्या जिवांना एकत्रित राहावे व समरस व्हावे लागणार आहे, तेव्हा तू शिळेप्रमाणे स्थिरवृत्तीची अविचल बन. तुझ्या पुढील आयुष्यात आमच्या घराण्याची प्रतिष्ठा सांभाळून रहा. माझ्या कुटुंबाचे शील व मोठेपण हे सर्वस्वी तुझ्या शीलावर अवलंबून आहे. सासू-सासरे, नणंद, भावजय, जावा, दीर-भावे अशा अनेकांशी संबंध येतो. ही सर्व मंडळी तुझ्यातील त्रुटींवर उपहासाने हसतील, बोलतील. यामुळे तुला मानसिक क्लेश होईल. या सर्व मानसिक व शारीरिक क्लेशांना सहन करीत पतीच्या स्वभावाशी व गुणांशी समरस होण्याचे अवघड कार्य तुला पार पाडावयाचे आहे. सदाचरण, सेवाभाव

व मधुर भाषेने सर्वांचा स्नेह व सहानुभूती मिळवावयाची आहे. सर्व समस्यांना धैर्याने सामोरे जावयाचे आहे. घाबरू नकोस, स्थिर रहा. तू आज पित्याच्या घरातून जात आहेस. आता माझे दायित्व प्रारंभ होत आहे. तू जेव्हा-जेव्हा घरी येशील तेव्हा तुझी ओंजळ पवित्र कमाईने मी भरत राहीन.

## लाजाहोम

यानंतर वधूने वराच्या ओंजळीत आपली ओंजळ धरावी. त्यांच्या मागे वधूच्या आईने किंवा भावाने समदडीची किंवा आपट्याची (शमीची) पाने मिसळलेल्या लाजा असलेले सूप घेऊन उभे राहावे. भावाने उजव्या हाताने दोन वेळा सुपातील थोड्या-थोड्या लाह्या घेऊन वधू-वराच्या एकत्रित ओंजळीत टाकाव्यात. त्यावर थोडेसे तूप सोडावे. नंतर वधूने खालील तीन मंत्र म्हणत प्रत्येक मंत्रास एक ओंजळ याप्रमाणे तीन वेळा ओंजळीतील लाह्या प्रज्वलित अग्नीत सोडाव्यात.

## प्रथम परिक्रमा

**ओम् अर्यमणं देवं कन्या अग्निमयक्षत। स नो अर्यमा देवः प्रेतो मुञ्चतु मा पतेः स्वाहा।। इदमर्यम्णे अग्नये-इदन्न मम ।।१।।**

**ओम् इयं नार्युपब्रूते लाजानावपन्तिका। आयुष्मानस्तु मे पतिरेधन्तां ज्ञातयो मम स्वाहा।। इदमग्नये- इदन्न मम ।।२।।**

**ओम् इमाँल्लाजानावपाम्यग्नौ समृद्धिकरणं तव ।। मम तुभ्यं च संवननं तदग्निरनुमन्यतामियँ स्वाहा ।। इदमग्नये-इदन्न मम ।।३।।**

**पार. १।६।२।।**

**भावार्थ :** न्यायकारी, दिव्यस्वरूप परमात्म्याने आम्हांला पितृकुलापासून सोडवावे परंतु पतीपासून वेगळे करू नये अशी प्रार्थना कन्या परमेश्वराला करतात. यज्ञात लाजाच्या आहुती देत असताना ही नारी म्हणते की, माझा पती दीर्घायुषी व्हावा आणि माझ्या कुटुंबातील लोक धनधान्यसंपन्न होवोत.

हे पतिदेवा ! आपल्या समृद्धीसाठी ह्या लाजा मी अग्नीत सोडत आहे.

पृथ्वीसमान आहेस आणि मी सूर्यासमान आहे. आपण प्रसन्नतेने विवाह करूत. आपण दोघे उत्तम संतानांना जन्म देऊत. ही मुले वृद्धावस्थेपर्यंत जीवनयुक्त राहोत. उत्तम प्रकारांनी एक-दुसऱ्याशी प्रसन्न, रुचियुक्त, शुभमनाने शंभर वर्षे जीवन जगणारे, एक-दुसऱ्याशी प्रेमदृष्टीने पाहणारे व प्रियवचन बोलणारे राहोत.

## शिलारोहण

नंतर वधूच्या भावाने उजव्या हाताने वधूचा उजवा पाय उचलून शिलेवर ठेवावा. आणि त्या वेळी **वराने** म्हणावे -

**ओम् आरोहेममश्मानमश्मेव त्वं स्थिरा भव।**

**अभितिष्ठ पृतन्यतोऽवबाधस्व पृतनायतः।।१।।** पार.१।७।१।।

- हे देवी! तू ह्या शिळेवर चढ आणि धर्मकार्याच्या बाबतीत ह्या शिळेप्रमाणे खंबीर बन. ज्याप्रमाणे ही शिळा मुसळधार पावसाचे व वादळाचे आघात सोसूनही दृढ राहते, त्याप्रमाणे तू गृहस्थ जीवनात कधी वाईट प्रसंग किंवा संकटे आल्यास स्थिर राहा.

**विवेचन :** शिळा ही कठोरतेचे प्रतीक आहे. जेव्हा कोणी एखाद्याचे पाय धरतो तेव्हा त्याची लाज-अब्रू ज्याचे पाय धरले जातात त्याच्या हातात असते. वधूचा भाऊ वधूला म्हणतो, "पहा तुझ्या भावी जीवनात अनेक समस्या येतील. दोन भिन्न परिवारांत वाढलेल्या जिवांना एकत्रित राहावे व समरस व्हावे लागणार आहे, तेव्हा तू शिळेप्रमाणे स्थिरवृत्तीची अविचल बन. तुझ्या पुढील आयुष्यात आमच्या घराण्याची प्रतिष्ठा सांभाळून रहा. माझ्या कुटुंबाचे शील व मोठेपण हे सर्वस्वी तुझ्या शीलावर अवलंबून आहे. सासू-सासरे, नणंद, भावजय, जावा, दीर-भावे अशा अनेकांशी संबंध येतो. ही सर्व मंडळी तुझ्यातील त्रुटींवर उपहासाने हसतील, बोलतील. यामुळे तुला मानसिक क्लेश होईल. या सर्व मानसिक व शारीरिक क्लेशांना सहन करीत पतीच्या स्वभावाशी व गुणांशी समरस होण्याचे अवघड कार्य तुला पार पाडावयाचे आहे. सदाचरण, सेवाभाव

व मधुर भाषेने सर्वांचा स्नेह व सहानुभूती मिळवावयाची आहे. सर्व समस्यांना धैर्याने सामोरे जावयाचे आहे. घाबरू नकोस, स्थिर रहा. तू आज पित्याच्या घरातून जात आहेस. आता माझे दायित्व प्रारंभ होत आहे. तू जेव्हा-जेव्हा घरी येशील तेव्हा तुझी ओंजळ पवित्र कमाईने मी भरत राहीन.

## लाजाहोम

यानंतर वधूने.वराच्या ओंजळीत आपली ओंजळ धरावी. त्यांच्या मागे वधूच्या आईने किंवा भावाने समदडीची किंवा आपट्याची (शमीची) पाने मिसळलेल्या लाजा असलेले सूप घेऊन उभे राहावे. भावाने उजव्या हाताने दोन वेळा सुपातील थोड्या-थोड्या लाह्या घेऊन वधू-वराच्या एकत्रित ओंजळीत टाकाव्यात. त्यावर थोडेसे तूप सोडावे. नंतर वधूने खालील तीन मंत्र म्हणत प्रत्येक मंत्रास एक ओंजळ याप्रमाणे तीन वेळा ओंजळीतील लाह्या प्रज्वलित अग्नीत सोडाव्यात.

## प्रथम परिक्रमा

**ओम् अर्यमणं देवं कन्या अग्निमयक्षत। स नो अर्यमा देवः प्रेतो मुञ्चतु मा पतेः स्वाहा।। इदमर्यम्णे अग्नये-इदन्न मम ।।१।।**

**ओम् इयं नार्युपब्रूते लाजानावपन्तिका। आयुष्मानस्तु मे पतिरेधन्तां ज्ञातयो मम स्वाहा।। इदमग्नये- इदन्न मम ।।२।।**

**ओम् इमाँल्लाजानावपाम्यग्नौ समृद्धिकरणं तव ।। मम तुभ्यं च संवननं तदग्निरनुमन्यतामियँ स्वाहा ।। इदमग्नये-इदन्न मम ।।३।।**

**पार. १।६।२।।**

**भावार्थ :** न्यायकारी, दिव्यस्वरूप परमात्म्याने आम्हांला पितृकुलापासून सोडवावे परंतु पतीपासून वेगळे करू नये अशी प्रार्थना कन्या परमेश्वराला करतात. यज्ञात लाजाच्या आहुती देत असताना ही नारी म्हणते की, माझा पती दीर्घायुषी व्हावा आणि माझ्या कुटुंबातील लोक धनधान्यसंपन्न होवोत.

हे पतिदेवा! आपल्या समृद्धीसाठी ह्या लाजा मी अग्नीत सोडत आहे.

मी आणि आपण परस्पर प्रेमाने राहूत. यात ईश्वर आमचा सहायक होवो.

## हस्तग्रहण

नंतर वराने वधूचा हात धरून खालील मंत्र म्हणावा -

**ओं सरस्वति प्रेदमव सुभगे वाजनीवति। यान्त्वा विश्वस्य भूतस्य प्रजायामस्याग्रतः। यस्यां भूतँ् समभवद् यस्यां विश्वमिदं जगत्। तामद्य गाथां गास्यामि या स्त्रीणामुत्तमं यशः ।।१।।**

**भावार्थः-** हे ज्ञानवती सौभाग्यवती, अन्नपूर्णे देवी! तू ह्या गृहस्थरूपी यज्ञाचे जाणीवपूर्वक रक्षण कर. तू ह्या संपूर्ण प्राणिमात्राची वास्तविक जननी आहेस, हे ह्या गृहस्थाश्रमाच्या पूर्वीपासूनच विद्वान लोक जाणतात. तुझ्या उत्पादन-सामर्थ्याची यशोगाथा (प्रजनन-गाथा) मी आजपासून गाईन.

नंतर वराने खालील मंत्र म्हणून वधूसह यज्ञकुंडाची प्रदक्षिणा करावी.

## प्रदक्षिणा

**ओं तुभ्यमग्रे पर्यवहन्त्सूर्यां वहतुना सह। पुनः पतिभ्यो जायां दा अग्ने प्रजया सह।। ओं कन्यला पितृभ्यः पतिलोकं यतीयमप दीक्षामयष्ट। कन्या उत त्वया वयं धारा उदन्या इवातिगाहेमहि द्विषः ।।२।।**

**भावार्थः-** हे गृहस्थाश्रमाच्या प्रेरक परमेश्वरा! तू बनवलेल्या प्राजापत्यधर्मच्या पालनासाठी उषेसमान सुंदर असलेल्या ह्या कन्येचा मी स्वीकार केला आहे. माझ्यासोबत राहून हिने गृहस्थधर्माचा भार उचलावा. प्रजनन सामर्थ्याने युक्त असलेल्या हिला आपण कालांतराने पुत्रांसहित मला प्रदान करावे.

ही कन्या पित्याचे घर सोडून पतीच्या घरी जात आहे. ह्या कन्येने गृहस्थाश्रमाचे व्रत धारण केले आहे. ही नेहमी माझ्याबरोबर राहो. आम्ही सर्वांनी मिळून पाण्याच्या वेगवान धारेप्रमाणे असणाऱ्या गृहसौख्यात विघ्न आणणाऱ्या विरोधी कर्मांना - विचारांना दूर करावे - नष्ट करावे.

वरीलप्रमाणे लाजाहोमाची पहिली परिक्रमा (प्रदक्षिणा) संपली.

## दुसरी व तिसरी परिक्रमा

पहिल्या परिक्रमेप्रमाणेच परत-परत तेच मंत्र म्हणून, लाजाहुती देऊन व हात धरून कलशसहित दुसरी व तिसरी परिक्रमा पूर्ण करावी.

## चौथी प्ररिक्रमा

नंतर सुपात शिल्लक राहिलेल्या सर्व लाजा वधूच्या ओंजळीत टाकाव्यात व वधूने खालील मंत्र म्हणून आहुती द्यावी.

**ओं भगाय स्वाहा। इदं भगाय - इदन्न मम।।**

हा मंत्र म्हणून **कलशसहित यज्ञकुंडाची प्रदक्षिणा** करावी व नंतर **वराने** खालील मंत्र म्हणून तुपाची एक आहुती द्यावी.

**ओं प्रजापतये स्वाहा। इदं प्रजापतये - इदन्न मम।।**

**विवेचन :** लाजाहोमात पती व पत्नी एकत्र ओंजळीने साळीच्या लाह्या (लाजा) व शमीची (आपट्याची / समदडीची) पाने व तूप यांच्या आहुत्या देतात. यापुढे दानधर्म हा दोघांनी मिळून करत राहावा हा उद्देश. यात साळीच्या लाह्या हे पती-पत्नींचे प्रतीक मानले जाते. साळीला टरफल (भुसा) असते व त्या टरफलात तांदूळ असतो. हे दोन्ही जोडून असल्यावरच पेरले तर रोपटे तयार होते. त्याप्रमाणेच पती-पत्नी एकरूप असतील तरच प्रजा निर्माण होते. केवळ टरफलास किंवा केवळ तांदळास रोपटे तयार करणे असंभवच. यास्तव पुरुषाने सहधर्मिणीची प्रतिष्ठा करावी. तसेच साळीत तांदूळ असेपर्यंत साळीला किंमत असते. साळी भरडल्यावर भुशाला किंमत राहत नाही. त्याप्रमाणेच प्रजननाकरिता पती आवश्यक आहे. स्त्री जोपर्यंत पतीबरोबर असते तोपर्यंत तिची शोभा, तिचा आदर असतो.

याचा दुसरा भाव असा की साळीची वाढ करण्यासाठी साळीचे रोप तयार करतात. नंतर ते रोप दुसरीकडे नेऊन लावतात. कन्येचे देखील असेच आहे. ती प्रथम माता-पित्यांच्या घरी जन्म घेते तेथून ती पतिगृही संसार करावयास जाते. तिच्यामुळे पतीच्या घराची समृद्धी वाढते.

शमीच्या पानांचे वैशिष्ट्य हे की ती पाने संयुक्त (जोड) असतात. एक-एकटे पान राहतच नाही. निसर्गाने त्याची उत्पत्ती संयुक्तच केलेली आहे. शिवाय वाळल्यावरही ती पाने हिरवीच राहतात. त्याप्रमाणे वधू-वरांचे जीवन टवटवीत, आनंदित, प्रफुल्लित व संयुक्त राहो हा भाव. शेवटच्या मंत्रात वधू परमेश्वराला प्रार्थना करते की - "हे परमेश्वरा! मला पतिकुळापासून विभक्त करू नका. माझे पतिराज आयुष्यमान होवोत, माझे कुटुंबीय व आप्तेष्ट जन समृद्ध होवोत. परमात्मा आम्हांला सहायक होवो."

या विधीत वधू-वर यज्ञाभोवती प्रदक्षिणा घालतात. ह्यात ही भावना आहे की, वधूवरांना धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ प्राप्त होवोत. गृहस्थाश्रमाची कीर्ती चारी दिशांत व्यापक व्हावी. चार वेद, चार वर्ण, चार आश्रम या निष्ठेचे प्रतीक आहे.

## केशमोचन

यानंतर एकान्तात जाऊन **वराने** वधूच्या केसांना मोकळे करून म्हणावे-

**ओं प्र त्वा मुञ्चामि वरुणस्य पाशाद्येन त्वाबध्नात्सविता सुशेवः।**
**ऋतस्य योनौ सुकृतस्य लोकेऽरिष्टां त्वा सह पत्या दधामि।।१।।**

**ऋ.१०।८५।२५।।**

**ओं प्रेतो मुञ्चामि नामुतः सुबद्धाममुतस्करम्।**
**यथेयमिन्द्र मीढ्वः सुपुत्रा सुभगासति।।२।।** **ऋ. १०।८५।२५।।**

**भावार्थ :-** हे वधू! आजपर्यंत तू माता-पित्याच्या ममतेत, मोहात गुरफटलेली होतीस. आज तुझे केस मोकळे करून मी तुला तुझ्या माता-पित्याच्या बंधनातून, मोहातून मुक्त करीत आहे. आजपासून तुझ्या माता-पित्यांच्या ठिकाणी तुझे सासू-सासरे आहेत. माझ्या आई-वडिलांनाच तू आई-वडील मान. आता तू माहेरच्या मोहात गुरफटून राहू नकोस. त्या मोहजालातून तू बाहेर पड. तुझ्यात धैर्य निर्माण कर. माझे कुळ सोडण्यासारखे कोणतेही कारण मी उपस्थित होऊ देणार नाही. मी तुझे केस मोकळे करून तुला शृंगार करण्याचा अधिकार देत आहे.

## ग्रंथिबंधन

या विधीत प्रथम पुरोहिताने किंवा सौभाग्यवती स्त्रीने वधूवराच्या पदरांची गाठ मारावी, यास 'ग्रंथिबंधन' म्हणतात.

**विवेचन :** जरी ही गाठ बाह्यस्वरूपात कपड्यांना मारलेली असलीतरी ती वधूवराच्या भावी आयुष्यासाठी त्यांच्या हृदयाला मारलेली गाठ आहे. आता वधूवरांची अंतःकरणे, हृदय व दोघांचे आचार-विचार एक झाले पाहिजेत. एकास काटा टोचला की दुसऱ्याच्या डोळ्यातून आसवे ओघळायला हवीत. वैदिक धर्मात घटस्फोटाचा उल्लेख नाही. आज या विधीने वधू-वर एक झाले आहेत. दोघांचा संबंध अखंडित झाला आहे.

तसेच ज्या हेतूने ही सात पावले चालावयाची आहेत तो हेतू एकटा पुरुष किंवा एकटी स्त्री पूर्ण करू शकत नाही म्हणून एक-दुसऱ्याचे सहकारी बनूनच गृहस्थरूपी जीवनमार्गावर खंबीरपणे पावले ठेवावी लागतात. यासाठीच हे ग्रंथिबंधन आहे.

## सप्तपदी

ग्रंथिबंधनानंतर वधू-वरांनी यज्ञकुंडाच्या उत्तरेच ईशान्येकडे मुख करून जोडीने जवळजवळ उभे राहावे. **वराने** आपला उजवा हात वधूच्या उजव्या खांद्यावर ठेवावा व खालील ७ मंत्र म्हणत एका मंत्राने एक पाऊल याप्रमाणे वधूबरोबर ७ पावले चालावे. प्रथम उजवा पाय उचलून पुढे ठेवावा नंतर डावा पाय उचलून उजव्या पायास जोडून उजव्या पायाच्या किंचित मागे ठेवावा.

प्रथम **वराने** खालील मंत्र म्हणून वधूला उजवा पाय उचलून चालण्याची आज्ञा द्यावी.

गोभिल २।२।१२।।

**मा सव्येन दक्षिणमतिक्राम।।**

हे वधू! तू डाव्या पायाने उजव्या पायास ओलांडू नकोस अर्थात तुझा उजवा पाय पुढे टाक. आपणांस यापुढील आयुष्यात सर्व कामे उजवी अर्थात चांगली करावयाची आहेत तेव्हा तू धर्ममार्गाने सरळ चाल, वाममार्गाने कुटिल

व उलट्या मार्गाने चालू नकोस.

वराने खालील मंत्र म्हणून वधूबरोबर ईशान्य दिशेकडे एकेक पाऊल चालावे.

**ओम् इषे एकपदी भव सा मामनुव्रता भव विष्णुस्त्वा नयतु पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ।।१।।** पहिले पाऊल

**ओम् ऊर्ज्जे द्विपदी भव सा मामनुव्रता भव विष्णुस्त्वा नयतु पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ।।२।।** दुसरे पाऊल

**ओं रायस्पोषाय त्रिपदी भव सा मामनुव्रता भव विष्णुस्त्वा नयतु पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ।।३।।** तिसरे पाऊल

**ओं मयोभवाय चतुष्पदी भव सा मामनुव्रता भव विष्णुस्त्वा नयतु पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ।।४।।** चौथे पाऊल

**ओं प्रजाभ्यः पंचपदी भव सा मामनुव्रता भव विष्णुस्त्वा नयतु पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ।।५।।** पाचवे पाऊल

**ओम् ऋतुभ्यः षट्पदी भव सा मामनुव्रता भव विष्णुस्त्वा नयतु पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ।।६।।** सहावे पाऊल

**ओं सखे सप्तपदी भव सा मामनुव्रता भव विष्णुस्त्वा नयतु पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ।।७।।** सातवे पाऊल

**भावार्थ :**

हे अन्नपूर्णे! अन्नप्राप्तीसाठी पहिले पाऊल उचल.

हे सबले! बलप्राप्तीसाठी दुसरे पाऊल उचल.

हे सौभाग्यशालिनी! धनधान्याच्या समृद्धीसाठी तिसरे पाऊल उचल.

हे सुखदे! सुखप्राप्तीसाठी चौथे पाऊल उचल.

हे प्रजावती! संततीसाठी पाचवे पाऊल उचल.

हे आरोग्यवंती! ऋतुअनुकूल आचरणासाठी, स्वास्थ्यप्राप्तीसाठी सहावे पाऊल उचल.

हे जीवनसखी! प्रगाढ प्रेम, पारस्परिक प्रसन्नता व मित्रत्वासाठी सातवे पाऊल उचल. तू माझ्या व्रतानुकूल चालणारी हो. परमेश्वर तुझा मार्गदर्शक होवो. ईश्वरकृपेने आपण पुष्कळ पुत्रांना प्राप्त करावे आणि ते सर्व दीर्घजीवी व्हावेत.

**विवेचन :-** सप्तपदी हा विवाहसंस्कारातील शेवटचा पण अतिमहत्त्वाचा टप्पा आहे. हा विधी पूर्ण झाल्याशिवाय धार्मिकदृष्ट्या व वैधानिकदृष्ट्या विवाह पूर्ण मानला जात नाही.

धनधान्य व अन्नाशिवाय गृहस्थाश्रम चालू शकत नाही. भरणपोषण, अतिथिसत्कार व इतर धार्मिक कार्यांसाठी धनधान्याची प्राप्ती आवश्यक आहे. मात्र हे धन व अन्न न्याय्य मार्गाने प्राप्त करावे. शरीराची हेळसांड करून धन कमवू नये. पत्नीने पतीच्या व्रतानुसार चालणे याचा अर्थ पतीचे जे आचरण धर्मानुसार असेल त्याप्रमाणे चालणे अर्थात पत्नीने पतीच्या कोणत्याही पापाचरणाच्या आज्ञा मानू नयेत किंवा पापाचरणास साथ देऊ नये. शारीरिक बलाशिवाय गृहस्थ जीवन सुखी होऊ शकत नाही म्हणून गृहस्थींनी बलाची उपासना केली पाहिजे. सुखोपभोग हा गृहस्थाचा प्राण आहे. सत्पात्री दान, ज्ञानप्राप्ती व अनन्य ईश्वरभक्ती असावी.

संतानप्राप्ती हा गृहस्थजीवनाचा प्रमुख उद्देश आहे. वंशसातत्यासाठी, कुलधर्माची परंपरा पुढे चालवण्यासाठी व वृद्धापकाळातील आधारासाठी संततीची अतिशय आवश्यकता असते. निपुत्रिकांचे जीवन अतिशय कष्टमय असते. सप्तपदीच्या प्रत्येक मंत्रात **'पुत्रान् विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टय:'** हे वाक्य उच्चारले जाते. येथे 'बहून्' ह्या शब्दाचा अर्थ एकापेक्षा अधिक असा समजावा, डझनावारी असा अर्थ करू नये. शारीरिक, आर्थिक, सामाजिक इत्यादी दृष्टीतून पती-पत्नी केवळ जन्मदाते म्हणून न राहता संरक्षक, पोषक, समृद्ध झाल्यावरच अधिक संतानांची अपेक्षा बाळगावी. अन्न, बळ, ऐश्वर्य व सुखानंतरच 'प्रजाभ्य:' शब्द आहे. संतानाकरिता केव्हाही संयमाचाच पाठ आचरणात आणला पाहिजे.

स्वास्थरक्षणाकरिता ऋतुमानानुसार योग्य आहार-विहार करण्याचा व मन प्रसन्न आणि आनंदित ठेवण्याचा संदेश यात आहे.

पती-पत्नीने गृहस्थ जीवनात एक-दुसऱ्याचे मित्र बनून राहिले पाहिजे. स्त्री म्हणजे पायाची दासी नसून ती सखी आहे. गृहस्थरूपी रथाच्या दोन चाकांपैकी ती एक चाक आहे. पती-पत्नीचा संबंध हा दास-दासीचा नसून स्वामी आणि स्वामिनीचा आहे. 'शतपथ'कार म्हणतात की, 'जाया'- धर्मपत्नी ही आत्म्याचा अर्धा भाग आहे. म्हणून तिला अर्धांगिनी, सहधर्मचारिणी, सहधर्मिणी म्हटले आहे. स्त्री ही पायातली वहाण किंवा नरकाचे द्वार नाही तर ती पूजनीय, वंदनीय आहे. राष्ट्राला पुनीत करणारी धर्माची चल प्रतिमा आहे. मनुस्मृतीत लिहिले आहे की, ज्या कुलात स्त्रीचा सत्कार होतो तेथेच देवता आनंदोत्सव साजरा करतात. याउलट ज्या कुटुंबात सदैव स्त्रीची अवहेलना होते, अपमान होतो तेथील कर्म निष्फळ होतात व अशांती, असमाधान पसरते, सर्वत्र दुःखाची छाया दिसू लागते.

वधूवरांनी आपल्या पुढील आयुष्यात या सात सूचनांनुसार चालण्याचे ठरविले तर त्यांचे जीवन निश्चितच समृद्ध व स्वर्ग बनेल.

ईशान्य दिशेकडे चालण्याचा हेतू हा की, गणितात अंकरेषेवरील ईशान्येकडील अंक धन असतात. तेव्हा वधूवरांनी आपल्या धन, यश, ज्ञान, चारित्र्य इत्यादी सर्वच बाबींची बेरीज म्हणजे वृद्धी करावयाची असते. पुढील आयुष्याचा मार्ग सुकर बनण्यासाठी सात पावले चालणे अर्थात सात पायऱ्यांवर चढणे आहे. प्रत्येक पायरी ही यशस्वी जीवनाला संदेश देणारी आहे. एक सुखी व व्यवस्थित परिवार स्वर्ग असतो, तर एक विकृत व अव्यवस्थित परिवारच नरक असतो.

## सप्तपदीचा राष्ट्रीय संदेश

१) राष्ट्रात भरपूर अन्न धान्य असावे. २) राष्ट्राचे संरक्षक दल मजबूत रहावे. ३) राष्ट्रात विपुल धन, वस्तू, पशुवृद्धी व उत्तम शिक्षणाच्या

सोयी असाव्यात. ४) प्रजा सुखी, समाधानी, आस्तिक, धर्म, देश व जातीबद्दल निष्ठावंत असावी. ५) उत्तम श्रेष्ठ, उत्स्फूर्त युवक व युवती असाव्यात. ६) देशातील आवास, पर्यटन, स्वास्थ विभाग जागरूक व कर्तव्यपरायण असावेत. ७) परस्पर प्रेम, भ्रातृभाव, एकता व द्वेषरहित उत्तम विचार असावेत.

प्रत्येक विवाहित जोडप्यांना या राष्ट्रीय भावनांची जाणीव राहिल्यास राष्ट्राचा सर्वांगीण विकास निश्चितच होईल.

## मस्तकावर जलसिंचन

यानंतर यज्ञकुंडाच्या दक्षिणेकडे कलश (घागर) घेऊन बसलेल्या पुरुषाने कलश घेऊन वधूवराजवळ यावे व त्यातील थोडे पाणी वधूवरांच्या मस्तकावर शिंपडावे. त्या वेळी **वराने** खालील मंत्र म्हणावेत -

**ओम् आपो हि ष्ठा मयोभुवस्ता नऽऊर्जे दधातन। महे रणाय चक्षसे ।।१।।**

**यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः। उशतीरिव मातरः।।२।।**

**तस्माऽअरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ। आपो जनयथा च नः।।३।।** यजु. ३६।१४-१६।।

**ओम् आपः शिवाः शिवतमाः शान्ताः शान्ततमास्तास्ते कृण्वन्तु भेषजम्।।४।।** पार. १।८।५।।

**भावार्थ :** हे जल शांती देणारे, बल-वीर्य वाढविणारे, समृद्धीचे कारण आणि आई-वडिलांप्रमाणे कल्याण करणारे होवो. हे जल आरोग्य देणारे आणि स्वास्थ्यकारक होवो.

**विवेचन :** वधू-वरांना बराच वेळ अग्नीजवळ बसावे लागले आहे. त्यामुळे त्यांचे मस्तक गरम झालेले आहे. अशा वेळी पाण्याचा शिडकावा देऊन डोके शांत - थंड केले जाते. तसेच गृहस्थाश्रमात काही कारणांनी कलहाग्नी (भांडण-तंटा, क्रोध इ.) प्रज्वलित झाल्यास घरातील वृद्ध व अनुभवी व्यक्तींनी थंड पाण्याप्रमाणे शांत डोक्याने व मधुर वचनांनी तो कलहाग्नी शांत करण्याचा

प्रयत्न करावा.

यानंतर **वधू-वरांनी** उठून खालील मंत्र म्हणून सूर्यदर्शन करावे.

## सूर्यदर्शन

**ओं तच्चक्षुर्देवहितं पुरस्ताच्छुक्रमुच्चरत्। पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतँ॒ शृणुयाम शरदः शतं प्र ब्रवाम शरदः शतमदीनाः स्याम शरदः शतं भूयश्च शरदः शतात।।१।।**

**भावार्थ :** हे प्रकाशस्वरूप परमेश्वरा! तू विद्वानांचे हित करणारा, शुद्ध नेत्रांप्रमाणे सर्वांना दाखविणारा, अनादिकाळापासून सर्वांना जाणणारा आहेस. तुझ्या कृपेने आम्ही शंभर वर्षांपर्यंत बोलावे, ऐकावे, पाहावे, कोणाच्याही अधीन न राहता स्वतंत्र राहावे व आणखी अधिक जगावे. सूर्याप्रमाणेच तेजस्वी बनावे.

**विवेचन :** या विधीत वधू-वर सूर्याप्रमाणे अविश्रांत गतीने पुढे-पुढे जाण्याचा संकल्प करतात. सूर्य खूप उंचीवर आहे, आपले ध्येयसुद्धा उच्च असावे. सूर्य स्वतः पवित्र असून इतरांना पवित्र करतो. तद्वत आपणही स्वतः पवित्र बनून आपल्या संपर्कात येणाऱ्यांना पवित्र बनवावे. सूर्य वेळेवर उगवतो व वेळेवर मावळतो. आपणसुद्धा आपली कार्ये नियमितपणे वेळेवर करावीत.

## हृदयस्पर्श

यानंतर **वराने** आपला उजवा हात वधूच्या उजव्या खांद्यावरून घेऊन वधूच्या हृदयाला स्पर्श करत खालील मंत्र म्हणावा -

**ओं मम व्रते ते हृदयं दधामि मम चित्तमनु चित्तं ते अस्तु।**

**मम वाचमेकमना जुषस्व प्रजापतिष्ट्वा नियुनक्तु मह्यम्।।**

**भावार्थ :-** हे वधू! मी तुझ्या अंतःकरणास व आत्म्यास माझ्या कार्यानुकूल धारण करत आहे. नेहमी माझ्या चित्तानुकूल तुझे चित्त राहो. माझ्या वाणीस तू एकाग्रचित्ताने ग्रहण कर. प्रजापालक परमेश्वर तुला माझ्यासाठी नियुक्त करो.

यानंतर वधूनेही आपला उजवा हात वराच्या हृदयावर ठेवून वरील मंत्र (**ओं मम व्रते ....**) म्हणावा -

**भावार्थ :-** हे प्रियवर ! मी आपले हृदय, आत्मा आणि अंतःकरण यांना माझ्या प्रियाचरणरूपी कर्मांत धारण करते. सदा माझ्या चित्ताच्या अनुकूल आपले चित्त असावे. आपण एकाग्र होऊन माझे बोलणे ऐकावे - मनावर घ्यावे. आजपासून प्रजापतीने - परमेश्वराने आपणास माझ्या स्वाधीन केले आहे, तसे मलाही आपल्या स्वाधीन केले आहे. (आपण दोघांनी पतिव्रता व स्त्रीव्रत होऊन सर्व प्रकारचे व्यभिचार, अप्रिय भावनादी सोडून परस्पर प्रेमभावनेने व आनंदाने राहावे.)

**विवेचन :-** वैदिक विवाह हा एक उच्च कोटीचा रजिस्टर विवाहच आहे. येथे विवाहमंडप हे न्यायालय आहे. सर्वांत श्रेष्ठ न्यायाधीश परमात्मा आणि त्याचा प्रतिनिधी पुरोहित विद्यमान आहे. समारंभातील स्त्रिया व पुरुष साक्षीरूपात उपस्थित आहेत. वर-वधूचे हृदय हे त्यांचे रजिस्टर (कागद) आहेत, ज्यात विवाहसंबंधी सर्व बाबी अंकित आहेत. अंगठ्याच्या चिन्हस्थानी पूर्ण तळहाताचा छाप हृदयावर लावला गेला आहे. अशा प्रकारे वैदिक विवाह हा उच्च व उदात्त भावनांनी परिपूर्ण आहे. न्यायालयात मौखिक वचन प्रामाणिक होत नाही तर त्याला लेखबद्ध करून हस्ताक्षर व अंगठा चिन्हित करावा लागतो तेव्हा त्यात वैधता येते. त्याप्रमाणे आधी वाग्दान (वाणी) नंतर संकल्पविधीत पाणिग्रहण. म्हणजे एकाच वेळी 'वाणी' व 'पाणि' यांचा व्यवहार विवाहमंडपात होतो.

## लोकाचार : मंगळसूत्रधारण

मंगळसूत्र धारण करणे हे वेदशास्त्रानुमोदित नाही किंवा आर्यांच्या इतिहासाद्वारेही हे प्रमाणित नाही. 'संस्कारविधी'त याचा उल्लेख नाही. परंतु दक्षिणेकडील आंध्रप्रदेश, तामिळनाडू, कर्नाटक, केरळ, महाराष्ट्र व गुजरात या राज्यांमध्ये प्रचलित लोकरूढीनुसार सौभाग्यवती (विवाहित) स्त्रिया गळयात सोन्याचे मंगळसूत्र व पायांच्या बोटांमध्ये चांदीची जोडवी धारण करतात. विवाहाच्या वेळी सौभाग्यालंकार म्हणून हे मंगळसूत्र वराकडून वधूच्या गळयात घातले जाते. तसेच वधूच्या भांगेत कुंकूही भरले जाते. अलीकडे उत्तरेकडील

राज्यांमध्येही ही रूढी वेगाने पसरत आहे.

## वधूस आशीर्वाद देण्याविषयी प्रार्थना

नंतर वराने वधूच्या मस्तकावर हात ठेवून खालील मंत्र म्हणून विवाहमंडपातील लोकांना वधूस आशीर्वाद देण्याची प्रार्थना करावी.

**ओं सुमङ्गलीरियं वधूरिमां समेत पश्यत।**

**सौभाग्यमस्यै दत्वा याथास्तं वि परेतन।।** ऋ. १०।८५।३३।।

**भावार्थ :-** हे उपस्थित सज्जनहो! ही वधू मंगलस्वरूप आहे. हिच्यावर आपली कृपादृष्टी असावी. हिच्याकडे आपण सर्वांनी मंगल व पवित्र दृष्टीने पहावे. आपण हिला सौभाग्याचा आशीर्वाद देऊनच आपापल्या घरी परतावे. परंतु जाताना परान्मुख होऊन न जाता प्रसन्नतेने पुत्रादिकांच्या मंगलकार्यास परत येण्याच्या उद्देशाने जावे.

## आशीर्वाद

नंतर वराच्या प्रार्थनेप्रमाणे **सर्व उपस्थितांनी** खालीलप्रमाणे वधू-वरास आशीर्वाद द्यावा -

**ओं सौभाग्यमस्तु। ओं शुभं भवतु।।**

– तुमचे सौभाग्य अखंड राहो. घरात सर्व प्रकारचे कल्याण होवो.

यानंतर वधू-वरांनी यज्ञकुंडाजवळ पूर्वीप्रमाणे बसून पुढीलप्रमाणे **स्विष्टकृत** आहुती व **व्याहृति** आहुती द्याव्यात -

## स्विष्टकृत आहुती

**ओं यदस्य कर्मणोऽत्यरीरिचं यद्वा न्यूनमिहाकरम्। अग्निष्टत्स्विष्टकृद्विद्यात्सर्वं स्विष्टं सुहुतं करोतु मे। अग्नये स्विष्टकृते सुहुतहुते सर्वप्रायश्चित्ताहुतीनां कामानां समर्द्धयित्रे सर्वान्नः कामान्त्समर्द्धय स्वाहा।। इदमग्नये स्विष्टकृते इदन्न मम।।**

### व्याहृत्याहुती

ओं भूरग्नये स्वाहा।। इदमग्नये-इदन्न मम।। ओं भुवर्वायवे स्वाहा।। इदं वायवे-इदन्नमम।।

ओं स्वरादित्याय स्वाहा।। इदमादित्य - इदन्न मम।।

ओं भूर्भुवः स्वरग्निवाय्वादित्येभः स्वाहा।। इदमग्निवाय्वादित्येभः इदन्न मम।।

याप्रमाणे विवाहाचा पूर्वविधी संपला. यानंतर वधू-वरांनी विश्रांती घ्यावी.

## विवाहाचा उत्तरविधी

वधू-वराने थोडीशी विश्रांती घेतल्यावर विवाहाचा उत्तरविधी सुरू करावा. हा विधी वधूच्या घरी ईशान्य दिशेकडे खास करून बनवलेल्या एका खोलीत करावा.

### सामान्य होम

सूर्यास्त झाल्यावर आकाशात जेव्हा नक्षत्रे (चांदण्या-तारे) दिसू लागतील तेव्हा वधू-वराने यज्ञकुंडाच्या पश्चिमभागी पूर्वाभिमुख बसावे व अग्न्याधान करावे. (विवाहमंडप पूर्वीच ईशान्येकडे असेल व प्रथम अग्न्याधान केलेले असेल तर या वेळी अग्न्याधान करू नये.)

### अग्न्याधान

ओं भूर्भुवः स्वर्द्यौरिव भूम्ना पृथिवीव वरिम्णा।
तस्यास्ते पृथिवि देवयजनि पृष्ठेऽग्निमन्नादमन्नाद्यायादधे।।

### समिधाधान

ओम् अयन्त इध्म आत्मा जातवेदस्तेनेध्यस्व वर्धस्व चेद्धवर्द्धय चास्मान् प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन समेधय स्वाहा ।। इदमग्नये जातवेदसे इदन्न मम।।१।। पहिली समिधा

ओं समिधाग्निं दुवस्यत घृतैर्बोधयतातिथिम् । आस्मिन् हव्या जुहोतन स्वाहा।। इदमग्नये- इदन्न मम ।।२।।

ओं सुसमिद्धाय शोचिषे घृतं तीव्रं जुहोतन। अग्नये जातवेदसे स्वाहा। इदमग्नये जातवेदसे - इदन्न मम।।३।।

या दोन मंत्रांनी दुसरी समिधा

ओं तन्त्वा समिद्भिरङ्गीरो घृतेन वर्द्धयामसि। बृहच्छोचा यविष्ठ्य स्वाहा। इदमग्नयेऽङ्गिरसे इदन्न मम।।४।। तिसरी समिधा यजु.३।१-३।।

यानंतर खालील मंत्र पाच वेळा म्हणत तुपाच्या पाच आहुती द्याव्यात.

ओम् अयन्त इध्म आत्मा जातवेदस्तेनेध्यस्व वर्धस्व चेद्धवर्द्धय चास्मान् प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन समेधय स्वाहा।। इदमग्नये जातवेदसे इदन्न मम।।

## आघारावाज्यभागाहुती

ओम् अग्नये स्वाहा। इदमग्नये इदन्न मम।। वेदीच्या उत्तरभागी

ओम् सोमाय स्वाहा। इदं सोमाय इदन्न मम।। वेदीच्या दक्षिणभागी

ओम् प्रजापतये स्वाहा। इदं प्रजापतये इदन्न मम।।

ओम् इन्द्राय स्वाहा। इदमिन्द्राय इदन्न मम।।

या दोन्ही मंत्रांनी वेदीच्या मध्यभागी दोन आहुत्या द्याव्यात.

## व्याहृत्याहुती

ओं भूरग्नये स्वाहा।। इदमग्नये इदन्न मम।।

ओं भुवर्वायवे स्वाहा।। इदं वायवे इदन्न मम।।

ओं स्वरादित्याय स्वाहा।। इदमादित्याय-इदन्न मम।।

ओं भूर्भुवःस्वरग्निवाय्वादित्येभ्यः स्वाहा।।

इदमग्निवाय्वादित्येभ्यः - इदन्न मम।। गोभिल ।१।८।१५।।

ह्या चार तुपाच्या आहुती द्याव्यात.

## प्रधान होम

ह्यानंतर खालील ६ मंत्रांनी आहुत्या देत प्रधानहोम करावा.

**ओं लेखासन्धिषु पक्ष्मस्वारोकेषु च यानि ते। तानि ते पूर्णाहुत्या सर्वाणि शमयाम्यहं स्वाहा।। इदं कन्यायै-इदन्न मम।।१।।**

**ओं केशेषु यच्च पापकमीक्षिते रुदिते च यत्। तानि ते पूर्णाहुत्या सर्वाणि शमयाम्यहं स्वाहा।। इदं कन्यायै-इदन्न मम।।२।।**

**ओं शीलेषु यच्च पापकं भाषिते हसितेच यत्। तानि ते पूर्णाहुत्या सर्वाणि शमयाम्यहं स्वाहा।। इदं कन्यायै-इदन्न मम।।३।।**

**ओम् आरेकेषु च दन्तेषु हस्तयोः पादयोश्च यत्। तानि ते पूर्णाहुत्या सर्वाणि शमयाम्यहं स्वाहा।। इदं कन्यायै-इदन्न मम।।४।।**

**ओम् ऊर्वोरुपस्थे जङ्घयोः सन्धानेषु च यानि ते। तानि ते पूर्णाहुत्या सर्वाणि शमयाम्यहं स्वाहा।। इदं कन्यायै-इदन्न मम।।५।।**

**ओं यानि कानि च घोराणि सर्वांगेषु तवाभवन्। पूर्णाहुतिभिराज्यस्य सर्वाणि तान्यशीशमं स्वाहा।। इदं कन्यायै-इदन्न मम।।६।।**

या सहा मंत्रांमध्ये क्षेत्रशुद्धी अर्थात योनिसंस्काराचे वर्णन आहे.

**भावार्थ :-** हे कन्ये! तुझ्या माथ्यावरील भुवयांच्या रेषांच्या संधी, डोळ्यांच्या पापण्या, नाभिरंध्र इत्यादींमध्ये जे दोष असतील त्या सर्वांना मी उत्तम उपायांनी दूर करीन. माझी ही शुभ प्रार्थना सफल व्हावी. ह्या कन्येच्या शरीराच्या बाहेरील आणि आतील शुद्धीसाठी ही आहुती देत आहे, ही आहुती माझ्यासाठी नाही.

आणि जे तुझ्या केसांमधील दोष, तुझ्या पाहण्या-रडण्यातील अनुचितपणा, स्वभावातील वाईट सवयी, बोलण्यातील व थट्टा-मस्करीतील कुरूपता, तुझे जबडे, दात, हात, पाय यांच्यातील वेडेवाकडेपणा; दोन्ही कटिप्रदेश, योनिप्रदेश, जांघा, घोटे, गुडघे इत्यादी सांध्यांमध्ये जे विकार आहेत आणि इतर कोणते भयानक विकार-दोष तुझ्या इतर सर्व अवयवांमध्ये असतील त्या सर्वांना मी

तुपाच्या पूर्ण प्रयोगाने शांत करण्याचा निश्चय केला आहे.

### व्याहृत्याहुती

**ओं भूरग्नये स्वाहा।। इदमग्नये इदन्न मम।।**

**ओं भुवर्वायवे स्वाहा।। इदं वायवे इदन्न मम।।**

**ओं स्वरादित्याय स्वाहा।। इदमादित्याय-इदन्न मम।।**

**ओं भूर्भुवःस्वरग्निवाय्वादित्येभ्यः स्वाहा।।**

**इदमग्निवाय्वादित्येभ्यः - इदन्न मम।।** गोभिल ।१।८।१५।।

ह्या चार तुपाच्या आहुती द्याव्यात.

## ध्रुव व अरुंधती दर्शन

ह्यानंतर वधू-वराने यज्ञावरून उठून बाहेर उत्तर दिशेला जावे व **वरान** वधूला ध्रुव तारा दाखवून म्हणावे -

**ध्रुवं पश्य।** - ध्रुव तारा पहा.

यावर **वधूने** वराला म्हणावे -

**पश्यामि।** - मी ध्रुव तारा पाहत आहे.

त्यानंतर **वधूने** म्हणावे -

**ओं ध्रुवमसि ध्रुवाहं पतिकुले भूयासम् (अमुष्य[1] असौ[2])।।**

- हे ध्रुवताऱ्या जसा तू आकाशात आपल्या स्थानी अढळ आहेस, त्याप्रमाणे ..............[3] नावाची मी ..............[4] नावाच्या आपल्या पतीच्या कुळात स्थिर होऊन राहीन.

---

१. 'अमुष्य' पदाच्या जागी पतीचे नाव षष्ठी विभक्तीच्या एकवचनात उच्चारावे.

२. 'असौ' पदाच्या जागी वधूने आपले स्वतःचे नाव प्रथमा विभक्तीच्या एकवचनात उच्चारावे. उदा. पतीचे नाव 'वेदकुमार' असेल आणि पत्नीचे नाव 'शुभदा' असेल तर पूर्ण मंत्र याप्रमाणे म्हणावा - **'ओं ध्रुवमसि ध्रुवाहं पतिकुले भूयासं वेदकुमारस्य शुभदाहम्।'**

३. येथे रिकाम्या जागी वधूने स्वतःचे नाव उच्चारावे.

४. येथे रिकाम्या जागी पतीचे नाव उच्चारावे.

त्यानंतर **वराने** वधूला अरुंधती तारा दाखवून म्हणावे -

**अरुन्धतीं पश्य।।** - अरुंधती तारा पाहा.

**वधूने** म्हणावे -

**पश्यामि।।** - मी पाहत आहे.

त्यानंतर **वधूने** वराकडे पाहत म्हणावे -

**ओम् अरुन्धत्यसि रुद्धाहमस्मि (अमुष्य[१] असौ[२])।।**

- हे अरुंधती तारिके! ज्याप्रमाणे तू आकाशात वसिष्ठ ताऱ्याजवळ स्थिर आहेस, त्याप्रमाणे मी ............[३] नावाची ............[४] ची पत्नी गृहस्थाश्रमात पतीजवळ स्थिर आहे. अर्थात पतीच्या नियम-व्रतांमध्ये बांधली गेली आहे.

त्यानंतर **वराने** वधूच्या मस्तकावर हाथ ठेवून खालील मंत्र म्हणावेत-

**ओं ध्रुवा द्यौर्ध्रुवा पृथिवी ध्रुवं विश्वमिदं जगत्। ध्रुवासः पर्वता इमे ध्रुवा स्त्री पतिकुले इयम्।।**

**ओं ध्रुवमसि ध्रुवं त्वा पश्यामि ध्रुवैधि पोष्ये मयि। मह्यं त्वादाद् बृहस्पतिर्मया पत्या प्रजावती सं जीव शरदः शतम्।।**

**भावार्थः-** हे वरानने! सूर्याची कांती विद्युत, सूर्यलोक किंवा पृथिव्यादींमध्ये स्थिर आहे. भूमी आपल्या स्वरूपात स्थिर आहे. हे संपूर्ण ब्रह्मांड प्रवाहरूपात स्थिर आहे, पर्वत आपल्या स्थितीत स्थिर आहेत, तसे तू माझी पत्नी माझ्या कुलात सदा स्थिर राहा.

हे सुमुखी! धारण आणि पालन करण्यास समर्थ असा मी तुझा पती आहे. माझ्याजवळ नेहमी टिकून राहा. आपल्या मनाप्रमाणे परमेश्वराने तुला

---

१. 'अमुष्य' पदाच्या जागी पतीचे नाव षष्ठी विभक्तीच्या एकवचनात उच्चारावे.

२. 'असौ' पदाच्या जागी वधूने आपले स्वतःचे नाव प्रथमा विभक्तीच्या एकवचनात उच्चारावे.

३. येथे रिकाम्या जागी वधूने स्वतःचे नाव उच्चारावे.

४. येथे रिकाम्या जागी पतीचे नाव उच्चारावे.

माझ्यासाठी दिले आहे. तू माझ्याबरोबर उत्तम संततीने युक्त होऊन शंभर वर्षे जग.

यानंतर दोघांनी यज्ञकुंडाजवळ पूर्वाभिमुख बसून तीन आचमने करावीत.

## आचमन

ओम् अमृतोपस्तरणमसि स्वाहा ।।१।।

ओम् अमृतापिधानमसि स्वाहा ।।२।।

ओं सत्यं यशः श्रीर्मयि श्रीःश्रयतां स्वाहा।।३।।

यानंतर घृत, स्थालीपाक अर्थात भात तयार करून घ्यावा.

खालील मंत्रांनी समिधाहोम करावा.

## समिधाधान

ओम् अयन्त इध्म आत्मा जातवेदस्तेनेध्यस्व वर्धस्व चेद्धवर्द्धय चास्मान् प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन समेधय स्वाहा ।। इदमग्नये जातवेदसे इदन्न मम।।१।। पहिली समिधा

ओं समिधाग्निं दुवस्यत घृतैर्बोधयतातिथिम् । आस्मिन् हव्या जुहोतन स्वाहा।। इदमग्नये- इदन्न मम ।।२।।

ओं सुसमिद्धाय शोचिषे घृतं तीव्रं जुहोतन। अग्नये जातवेदसे स्वाहा। इदमग्नये जातवेदसे - इदन्न मम।।३।।

या दोन मंत्रांनी दुसरी समिधा

ओं तन्त्वा समिद्भिरङ्गीरो घृतेन वर्द्धयामसि। बृहच्छोचा यविष्ठ्य स्वाहा। इदमग्नयेऽङ्गिरसे इदन्न मम।।४।। तिसरी समिधा यजु.३।१-३।।

यानंतर आघारावाज्यभागाहुती द्याव्यात.

## आघारावाज्यभागाहुती

ओम् अग्नये स्वाहा। इदमग्नये इदन्न मम।। वेदीच्या उत्तरभागी

ओम् सोमाय स्वाहा। इदं सोमाय इदन्न मम।। वेदीच्या दक्षिणभागी

ओम् प्रजापतये स्वाहा। इदं प्रजापतये इदन्न मम।।

**ओम् इन्द्राय स्वाहा। इदमिन्द्राय इदन्न मम।।**

या दोन्ही मंत्रांनी वेदीच्या मध्यभागी दोन आहुत्या द्याव्यात.

यानंतर व्याहृत्याहुती द्याव्यात.

## व्याहृत्याहुती

**ओं भूरग्नये स्वाहा।। इदमग्नये इदन्न मम।।**

**ओं भुवर्वायवे स्वाहा।। इदं वायवे इदन्न मम।।**

**ओं स्वरादित्याय स्वाहा।। इदमादित्याय-इदन्न मम।।**

**ओं भूर्भुवःस्वरग्निवाय्वादित्येभ्यः स्वाहा।।**

**इदमग्निवाय्वादित्येभ्यः - इदन्न मम।।** गोभिल ।१।८।१५।।

ह्या चार तुपाच्या आहुती द्याव्यात.

## भाताचा विशेष होम

शिजवलेल्या भातावर तूप टाकून, मिसळून दोघांनी थोडा-थोडा भात घेऊन खालील मंत्रांनी आहुत्या द्याव्यात.

**ओम् अग्नये स्वाहा।। इदमग्नये-इदन्न मम - ओं प्रजापतये स्वाहा।। इदं प्रजापतये - इदन्न मम।। ओं विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा।। इदं विश्वेभ्यो देवेभ्यः - इदन्न मम।। - ओम् अनुमतये स्वाहा।। इदमनुतये - इदन्न मम।।**

यानंतर स्विष्टकृत मंत्राने तुपाची एक आहुती द्यावी.

## स्विष्टकृत आहुती

**ओं यदस्य कर्मणोऽत्यरीरिचं यद्वा न्यूनमिहाकरम्। अग्निष्टत्स्विष्टकृद्विद्यात्सर्वं स्विष्टं सुहुतं करोतु मे। अग्नये स्विष्टकृते सुहुतहुते सर्वप्रायश्चित्ताहुतीनां कामानां समर्द्धयित्रे सर्वान्नः कामान्त्समर्द्धय स्वाहा।। इदमग्नये स्विष्टकृते इदन्न मम।।**

यानंतर व्याहृत्याहुती द्याव्यात.

## व्याहृत्याहुती

ओं भूरग्नये स्वाहा।। इदमग्नये इदन्न मम।।
ओं भुवर्वायवे स्वाहा।। इदं वायवे इदन्न मम।।
ओं स्वरादित्याय स्वाहा।। इदमादित्याय-इदन्न मम।।
ओं भूर्भुवःस्वरग्निवाय्वादित्येभ्यः स्वाहा।।
इदमग्निवाय्वादित्येभ्यः - इदन्न मम।। गोभिल ।१।८।१५।।

ह्या चार तुपाच्या आहुती द्याव्यात.

नंतर खालील मंत्राने तुपाच्या आहुती द्याव्यात.

## अष्टाज्याहुती

ओं त्वं नोऽअग्ने वरुणस्य विद्वान् देवस्य हेळोऽव यासिसीष्ठाः। यजिष्ठो वह्नितमः शोशुचानो विश्वा द्वेषांसि प्र मुमुग्ध्यस्मत् स्वाहा। इदमग्निवरुणाभ्याम् इदन्न मम।।१।। ऋ.४।१।४।।

ओं स त्वं नो अग्नेऽवमो भवोती नेदिष्ठोऽअस्या उषसो व्युष्टौ। अव यक्ष्व नो वरुणं रराणो वीहि मृळीकं सुहवो न एधि स्वाहा।। इदमग्निवरुणाभ्याम् इदन्न मम।।२।। ऋ.४।१।५।।

ओम् इमं मे वरुण श्रुधी हवमद्या च मृळय। त्वामवस्युराचके स्वाहा।। इदं वरुणाय - इदन्न मम।।३।। ऋ.१।२५।१९।।

ओं तत्त्वा यामि ब्रह्मणा वन्दमानस्तदा शास्ते यजमानो हविर्भिः। अहेळमानो वरुणेह बोध्युरुशंस मा न आयुः प्र मोषीः स्वाहा।। इदं वरुणाय - इदन्न मम।।४।। ऋ.१।२४।११।।

ओं ये ते शतं वरुण ये सहस्रं यज्ञिया पाशा वितता महान्तः। तेभिर्नोऽअद्य सवितोत विष्णुर्विश्वे मुञ्चन्तु मरुतः स्वर्काः स्वाहा।। इदं वरुणाय सवित्रे विष्णवे विश्वेभ्यो देवेभ्यो मरुद्भ्यः स्वर्केभ्यः इदन्न मम।। ५।।

कात्या. श्रौत. २५।१।११।।

ओम् अयाश्चाग्नेऽस्यनभिशस्तिपाश्च सत्यमित्त्वमया असि। अया

नो यज्ञं वहास्यया नो धेहि भेषजँ॒ स्वाहा।। इदमग्नये अयसे इदन्न मम ।।६।। कात्या. श्रौत. २५।१।११।।

ओम् उदुत्तमं वरुण पाशमस्मदवाधमं वि मध्यमं श्रथाय। अथा वयमादित्य व्रते तवानागसो अदितये स्याम स्वाहा।। इदं वरुणायऽऽदित्यायाऽदितये च इदन्न मम ।। ७।। ऋ.१।२४।१५।।

ओं भवतन्नः समनसौ सचेतसावरेपसौ। मा यज्ञँ॒ हिँ॒ सिष्टं मा यज्ञपतिं जातवेदसौ शिवौ भवतमद्य नः स्वाहा।। इदं जातवेदोभ्याम् - इदन्न मम ।।८।। यजु.५।३।।

## वधु-वरांचे सहभोजन

नंतर वराने शिल्लक राहिलेल्या भातात तूप मिसळून त्यावर उजवा हात ठेवून खालील मंत्रांचा मनात जप करावा व त्यातील थोडासा भात खावा. नंतर शिल्लक राहिलेला भात वधूने खावा.

ओम् अन्नपाशेन मणिना प्राणसूत्रेण पृश्निना।
बध्नामि सत्यग्रन्थिना मनश्च हृदयं च ते।।१।।
ओम् यदेतद्धृदयं तव तदस्तु हृदयं मम।
यदिदँ॒ हृदयं मम तदस्तु हृदयं तव ।।२।।
ओम् अन्नं प्राणस्य षड्विँ॒शस्तेन बध्नामि त्वा असौ[१] ।।३।।

**भावार्थ :-** हे वधू! ज्याप्रमाणे अन्नाशी प्राणांचा, प्राणांशी अन्नाचा व अन्न आणि प्राण यांचा अंतरिक्षाशी संबंध आहे, त्याप्रमाणे मी तुझे हृदय, मन आणि चित्त यांना सत्याच्या गाठीने बांधतो.

हे पत्नी! हे जे तुझे अंतःकरण आहे, ते माझ्या अंतःकरणासमान प्रिय होवो. तसेच हा जो माझा आत्मा, माझे प्राण आणि माझे मन आहे, ते तुझा आत्मा, प्राण आणि मन यांच्यासारखे नेहमी प्रिय राहावे.

अन्न, जे प्राणांचे पोषण करणारे २६ वे तत्त्व आहे, त्याने मी तुला घनिष्ठ प्रेमाने बांधतो.

यानंतर वधू-वराने यज्ञमंडपात शुभासनावर पूर्वाभिमुख बसून खालीलप्रमाणे सामवेदोक्त महावामदेव्यगान करावे.

## महावामदेव्यगान

ओं भूर्भुवः स्वः। कया नश्चित्र आ भुवदूती सदावृधः सखा। कया शचिष्ठया वृता।।१।।

ओं भूर्भुवः स्वः। कस्त्वा सत्यो मदानां मँहिष्ठो मत्सदन्धसः। दृढा चिदारुजे वसु।।२।।

ओं भूर्भुवः स्वः। अभी षु णः सखीनामविता जरितॄणाम्। शतं भवास्यूतये।।३।।

## महावामदेव्यम्

काऽ५या नश्चा३ यित्रा३ आभुवात्। ऊ। ती सदावृधः स। खा। औ३होहायि। कया२३शचायि। ष्ठयौहो३। हुंमा२। वाऽ२र्तो३ऽ५हायि।।१।।

काऽ५स्त्वा। सत्यो३मा३दानाम्। मा। हिष्ठो मात्सादन्ध। सा। औ३होहायि। दृढा२३ चिदा। रुजौहो३। हुम्मा२। वाऽ३सो३ऽ५हायि।।२।।

आऽ५भी। षु णा३ः सा३खीनाम्। आ। विता जरायि तॄ। णाम्। औ२३ हो हायि। शता२३म्भवा। सियोहो३ हुम्मा२। ताऽ२ यो३ऽ५ हायि।।३।।

**भावार्थ :-** नेहमी वृद्धीला प्राप्त होणारा पूजनीय, मित्र असलेला परमात्मा कशाने आमचे रक्षण करतो? अर्थात तो परमात्मा सुख देणाऱ्या उत्तम बुद्धियुक्त व्यवहाराने प्राप्त होतो व आमचे रक्षण करतो.।।१।।

अनेक आनंदांचा अत्युत्तम आनंदमय सत्यस्वरूप असा कोण तुला अंधकारातून बाहेर काढून आनंद देतो? अर्थात तो परमात्मा स्वास्थ्यरूपी औषध देऊन रोग नष्ट करतो व आनंद देतो.।।२।।

हे प्रभोः! आमचे जे समवयस्क व वृद्ध आहेत त्या सर्वांविषयी आमच्या मनात प्रेमाची भावना आहे. त्यांना अनेक प्रकारच्या कष्टांतून जावे लागते. त्यांचे शेकडो प्रकारांनी आपण रक्षण करता.।।३।।

**विवाहाचा उत्तरविधी समाप्त.**

## स्वस्तिवाचन

ओ३म् अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम्।
होतारं रत्नधातमम् ।।१।।
स नः पितेव सूनवेऽग्ने सूपायनो भव । सचस्वा नः स्वस्तये ।।२।।
स्वस्ति नो मिमीतामश्विना भगः स्वस्ति देव्यदितिरनर्वणः।
स्वस्ति पूषा असुरो दधातु नः स्वस्ति द्यावापृथिवी सुचेतुना ।।३।।
स्वस्तये वायुमुप ब्रवामहै सोमं स्वस्ति भुवनस्य यस्पतिः।
बृहस्पतिं सर्वगणं स्वतये स्वस्तय आदित्यासो भवन्तु नः।।४।।
विश्वे देवा नो अद्या स्वस्तये वैश्वानरो वसुरग्निः स्वस्तये।
देवा अवन्त्वृभवः स्वस्तये स्वस्ति नो रुद्रः पात्वंहसः।।५।।
स्वस्ति मित्रावरुणा स्वस्ति पथ्ये रेवति।
स्वस्ति न इन्द्रश्चाग्निश्च स्वस्ति नो अदिते कृधि।।६।।
स्वस्ति पन्थामनु चरेम सूर्याचन्द्रमसाविव।
पुनर्ददताघ्नता जानता सङ्गमेमहि ।।७।।
ये देवानां यज्ञिया यज्ञियानां मनोर्यजत्रा अमृता ऋतज्ञाः।
ते नो रासन्तामुरुगायमद्य यूयं पात स्वस्तिभिः सदा नः।।८।।
येभ्यो माता मधुमत्पिन्वते पयः पीयूषं द्यौरदितिरद्रिबर्हाः।
उक्थशुष्मान् वृषभरान्त्स्वप्नसस्ताँ आदित्याँ अनु मदा स्वस्तये।।९।।
नृचक्षसो अनिमिषन्तो अर्हणा बृहद्देवासो अमृतत्वमानशुः।
ज्योतीरथा अहिमाया अनागसो दिवो वर्ष्माणं वसते स्वस्तये।।१०।।
सम्राजो ये सुवृधो यज्ञमाययुरपरिह्वृता दधिरे दिवि क्षयम्।
ताँ आ विवास नमसा सुवृक्तिभिर्महो आदित्याँ अदितिं स्वस्तये ।।११।।
को वः स्तोमं राधति यं जुजोषथ विश्वे देवासो मनुषो यतिष्ठन।
को वोऽध्वरं तुविजाता अरं करद्यो नः पर्षदत्यंहः स्वस्तये।।१२।।
येभ्यो होत्रां प्रथमामायेजे मनुः समिद्धाग्निर्मनसा सप्तहोतृभिः।

त आदित्या अभयं शर्म यच्छत सुगा नः कर्त सुपथा स्वस्तये।।१३।।
य ईशिरे भुवनस्य प्रचेतसो विश्वस्य स्थातुर्जगतश्च मन्तवः।
ते नः कृतादकृतादेनसस्पर्यद्या देवासः पिपृता स्वतये।।१४।।
भरेष्विन्द्रं सुहवं हवामहेऽहोमुचं सुकृतं दैव्यं जनम्।
अग्निं मित्रं वरुणं सातये भगं द्यावापृथिवी मरुतः स्वस्तये।।१५।।
सुत्रामाणं पृथिवीं द्यामनेहसं सुशर्माणमदितिं सुप्रणीतिम्।
दैवीं नावं स्वरित्रामनागसमस्त्रवन्तीमा रुहेमा स्वस्तये।।१६।।
विश्वे यजत्रा अधि वोचतोतये त्रायध्वं नो दुरेवाया अभिह्रुतः।
सत्यया वो देवहूत्या हुवेम शृण्वतो देवा अवसे स्वस्तये।।१७।।
अपामीवामप विश्वामनाहुतिमपारातिं दुर्विदत्रामघायतः।
आरे देवा द्वेषो अस्मद्युयोतनोरुणः शर्म यच्छता स्वस्तये।।१८।।
अरिष्टः स मर्तो विश्व एधते प्र प्रजाभिर्जायते धर्मणस्परि।
यमादित्यासो नयथा सुनीतिभिरति विश्वानि दुरिता स्वस्तये।।१९।।
यं देवासोऽवथ वाजसातौ यं शूरसाता मरुतो हिते धने।
प्रातर्यावाणं रथमिन्द्र सानसिमरिष्यन्तमा रुहेमा स्वस्तये।।२०।।
स्वस्ति नः पथ्यासु धन्वसु स्वस्त्यप्सु वृजने स्वर्वति।
स्वस्ति नः पुत्रकृथेषु योनिषु स्वस्ति राये मरुतो दधातन ।।२१।।
स्वस्तिरिद्धि प्रपथे श्रेष्ठा रेक्णस्वत्यभि या वाममेति।
सा नो अमा सो अरणे नि पातु स्वावेशा भवतु देवगोपाः ।।२२।।
इषे त्वोर्ज्जे त्वा वायव स्थ देवो वः सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मणऽआप्यायध्वमघ्न्याइन्द्राय भागं प्रजावतीरनमीवाऽअयक्ष्मा मा वस्तेनऽईशत माघशँ्सो ध्रुवाऽअस्मिन् गोपतौ स्यात बह्वीर्यजमानस्य पशून्पाहि ।।२३।।
अ नो भद्राः क्रतवो यन्तु विश्वतोऽदब्धासोऽ अपरीतास उद्भिदः देवा नो यथा सदमिद्वृधे असन्नप्रायुवो रक्षितारो दिवेदिवे ।।२४।।

देवानां भद्रा सुमतिर्ऋजूयतां देवानाँ रातिरभि नो निवर्तताम् ।
देवानाँ सख्यमुपसेदिमा वयं देवा न आयुः प्रतिरन्तु जीवसे ।।२५।।
तमीशानं जगतस्तस्थुषस्पतिं धियञ्जिन्वमवसे हूमहे वयम्।
पूषा नो यथा वेदसामसद्वृधे रक्षिता पायुरदब्धः स्वस्तये ।।२६।।
स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः।
स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ।।२७।।
भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाँ सस्तनूभिर्व्यशेमहि देवहितं यदायुः।।२८।।
अग्न आ याहि वीतये गृणानो हव्यदातये।
नि होता सत्सि बर्हिषि ।।२९।।
त्वमग्ने यज्ञानां होता विश्वेषां हितः देवेभिर्मानुषे जने ।।३०।।
ये त्रिशप्ताः परियन्ति विश्वा रूपाणि बिभ्रतः।
वाचस्पतिर्बला तेषां तन्वो अद्य दधातु मे।।३१।।

## शान्तिकरण

शन्न इन्द्राग्नी भवतामवोभिः शन्न इन्द्रावरुणा रातहव्या ।
शमिन्द्रासोमा सुविताय शं योः शं न इन्द्रापूषणा वाजसातौ ।।१।।
शं नो भगः शमु नः शंसो अस्तु शं नःपुरन्धिः शमु सन्तु रायः।
शं नः सत्यस्य सुयमस्य शंसः शं नो अर्यमा पुरुजातो अस्तु ।।२।।
शं नो धाता शमु धर्ता नो अस्तु शं न उरूची भवतु स्वधाभिः।
शं रोदसी बृहती शं नो अद्रिः शं नो देवानां सुहवानि सन्तु ।।३।।
शं नो अग्निर्ज्योतिरनीको अस्तु शं नो मित्रावरुणावश्विना शम्।
शं न सुकृतां सुकृतानि सन्तु शं न इषिरो अभि वातु वातः।।४।।
शं नो द्यावापृथिवी पूर्वहूतौ शमन्तरिक्षं दृशये नो अस्तु।
शं नो औषधीर्वनिनो भवन्तु शंन्नो रजसस्पतिरस्तु जिष्णुः।।५।।
शं न इन्द्रो वसुभिर्देवो अस्तु शमादित्येभिर्वरुणः सुशंसः।

शं नो रुद्रो रुद्रेभिर्जलाषः शं नस्त्वष्टाग्नाभिरिह शृणोतु ।।६।।
शं न सोमो भवतु ब्रह्म शं नः शं नो ग्रावाणः शमु सन्तु यज्ञाः।
शं नः स्वरूणां मितयो भवन्तु शं नः प्रस्वः शम्वस्तु वेदिः ।।७।।
शं नः सूर्य उरुचक्षा उदेतु शं नश्चतस्त्रः प्रदिशो भवन्तु।
शं नः पर्वता ध्रुवयो भवन्तु शं नः सिन्धवः शमु सन्त्वापः ।।८।।
शं नो अदितिर्भवतु व्रतेभिः शं नो भवन्तु मरुतः स्वर्काः।
शं नो विष्णुः शमु पूषा नो अस्तु शं नो भवित्रं शम्वस्तु वायुः ।।९।।
शं नो देवः सविता त्रायमाणः शं नो भवन्तूषसो विभातीः।
शं नः पर्जन्यो भवतु प्रजाभ्यः शं नः क्षेत्रस्य पतिरस्तु शम्भुः ।।१०।।
शं नो देवा विश्वदेवा भवन्तु शं सरस्वती सह धीभिरस्तु।
शमभिषाचः शमुरातिषाचः शं नो दिव्याः पार्थिवाः शं नो अप्याः।११।।
शं नः सत्यस्य पतयो भवन्तु शं नो अर्वन्तः शमु सन्तु गावः।
शं न ऋभवः सुकृतः सुहस्ताः शं नो भवन्तु पितरो हवेषु ।।१२।।
शं नो अज एकपाद्देवो अस्तु शं नोऽहिर्बुध्न्यः शं समुद्रः।
शं नो अपां नपात्पेरुरस्तु शं नः पृश्निर्भवतु देवगोपाः।।१३।।
इन्द्रो विश्वस्य राजति । शन्नो अस्तु द्विपदे शं चतुष्पदे।।१४।।
शन्नो वातः पवताँ्शन्नस्तपतु सूर्यः ।
शन्नः कनिक्रद्देवः पर्जन्योऽअभिवर्षतु ।।१५।।
अहानि शं भवन्तु नः शँ्रात्रीः प्रति धीयताम् ।
शन्न इन्द्राग्नी भवतामवोभिः शन्न इन्द्रावरुणा रातहव्या ।
शन्न इन्द्रापूषणा वाजसातौ शमिन्द्रासोमा सुविताय शंयोः ।।१६।।
शन्नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये । शंयोरभिस्त्रवन्तु नः ।।१७।।
द्यौः शान्तिरन्तरिक्षँ्शान्तिः पृथिवी शान्तिरापः शान्तिरोषधयः शान्तिः।
वनस्पतयः शान्तिर्विश्वेदेवाः शान्तिर्ब्रह्म शान्तिः सर्वँ्शान्तिः शान्तिरेव
शान्तिः सा मा शान्तिरेधि ।।१८।।

तच्चक्षुर्देवहितं पुरस्ताच्छुक्रमुच्चरत्। पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतँ्शृणुयाम शरदः शतं प्रब्रवाम शरदः शतमदीनाः स्याम शरदः शतं भूयश्च शरदः शतात् ।।१९।।

यज्जाग्रतो दूरमुदैति दैवं तदु सुप्तस्य तथैवैति।
दूरङ्गमं ज्योतिषां ज्योतिरेकं तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ।।२०।।

येन कर्माण्यपसो मनीषिणो यज्ञे कृण्वन्ति विदथेषु धीराः।
यदपूर्वं यक्षमन्तः प्रजानां तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ।।२१।।

यत्प्रज्ञानमुत चेतो धृतिश्च यज्ज्योतिरन्तरमृतं प्रजासु।
यस्मान्नऽऋते किं चन कर्म क्रियते तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु।।२२।।

येनेदं भूतं भुवनं भविष्यत्परिगृहीतममृतेन सर्वम्।
येन यज्ञस्तायते सप्तहोता तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ।।२३।।

यस्मिन्नृचः साम यजूँ्षि यस्मिन् प्रतिष्ठिता रथनाभाविवाराः।
यस्मिंश्चित्तँ् सर्वमोतं प्रजानां तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ।।२४।।

सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनीयतेऽभीशुभिर्वाजिन इव।
हृत्प्रतिष्ठं यदजिरं जविष्ठं तन्मे मनः शिवसङ्कल्पमस्तु ।।२५।।

स नः पवस्व शं गवे शं जनाय शमर्वते । शंराजन्नोषधीभ्यः ।।२६।।

अभयं नः करत्यन्तरिक्षमभयं द्यावापृथिवी उभे इमे ।
अभयं पश्चादभयं पुरस्तादुत्तरादधरादभयं नो अस्तु ।।२७।।

अभयं मित्रादभयममित्रादभयं ज्ञातादभयं परोक्षात्।
अभयं नक्तमभयं दिवा नः सर्वा आशा मम मित्रं भवन्तु ।।२८।।



## संदर्भ ग्रंथ

१) संस्कारविधि - महर्षी दयानंद सरस्वती
२) संस्कार चन्द्रिका - डॉ. सत्यव्रत सिद्धान्तालंकार
३) संस्कार समुच्चय - मदनमोहन विद्यासागर
४) वैदिक विवाह पद्धति - स्वामी जगदीश्वरानंद सरस्वती
५) संस्कारविधी (मराठी अनुवाद) - सत्यव्रत बी. कामदार व सौ. सुमित्रादेवी सत्यव्रत कामदार

## श्री. भीमाशंकर साखरे यांची ग्रंथसंपदा

### मराठी

१) संध्योपासना
२) वैदिक विवाहपद्धतीवर एक दृष्टिक्षेप
३) अमृतवर्षा (वेदमंत्रांचा अनुवाद)
४) दैनिक पंचमहायज्ञविधी
५) गर्भाधान, पुंसवन, सीमन्तोन्नयन संस्कार (अप्रकाशित)
६) उपनयन - वेदारंभ संस्कार ~~(अप्रकाशित)~~
७) भगवान जिह्वेश्वर सार
८) भगवान जिह्वेश्वर चित्रकथा (द्वितीय संस्करण)

### हिन्दी

१) सन्ध्योपासना
२) विवाहसंस्कार की विशेषता
३) नरशार्दूल पं. नरेंद्रजी (तृतीय संस्करण)
४) दैनिक पंचमहायज्ञविधि
५) स्वधर्मसूर्य के आलोक मे विश्व (अनुवाद) (मूल मराठी-विश्वस्वधर्मसूर्ये पाहो - विमला ठकार)
६) सुमति-प्रज्ञा (अप्रकाशित) महिलाओं की समस्या
७) भगवान जिह्वेश्वर सार (सचित्र)
८) वैदिक विवाह पद्धति (अप्रकाशित)

### कन्नड

१) अमृतवर्षा (वेदमंत्र अनुवाद) (कन्नड - मराठी)
२) वैदिक विवाह विधी
३) भगवान जिह्वेश्वर चित्रकथा
४) भगवान जिह्वेश्वर सार



## श्री. भीमाशंकर चंद्रप्पा साखरे

प्रस्तुत ग्रंथाचे संपादक श्री. भीमाशंकर साखरे यांचा जन्म दि.१९ जुलै, १९३१ रोजी कर्नाटक प्रांतातील गुलबर्गा जिल्ह्यातील आळंद या तालुक्याच्या गावी एका शेतकरी कुटुंबात झाला. बालपणापासूनच यांच्यावर आर्य समाजाचा प्रभाव होता. वयाच्या केवळ १८ व्या वर्षी हे आर्यसमाज आळंदचे प्रधान झाले व २० वर्षे त्या पदावर कार्यरत राहिले. यांच्या प्रधानपदाच्या कारकीर्दीतच आर्यसमाजची भव्य वास्तू उभी राहिली. १९४८ च्या हैद्राबादच्या मुक्ति आंदोलनात यांनी सक्रिय भाग घेतला होता. केवळ ५ वीपर्यंत शिक्षण झालेले, आजतागायत शेतकरी म्हणून जीवन जगत असलेले श्री. साखरे हे एक स्वाध्यायशील, जिज्ञासू, निष्ठावंत, सरळमार्गी व प्रसिद्धीपासून दूर राहणारे, मनमिळाऊ गृहस्थ आहेत. त्यांनी कर्नाटक आर्य प्रतिनिधी सभेची वेगवेगळी पदे भूषविली आहेत. नुकतेच त्यांना कर्नाटक हिंदी प्रचार सभेवर आजीव सदस्य म्हणून घेण्यात आले आहे. आतापर्यंत मराठी, हिंदी व कन्नड भाषेत त्यांचे एकूण १५ ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. तसेच खालील नियतकालिकांतून त्यांचे वैचारिक लेख प्रकाशित होत आलेले आहेत. आर्य जगत् (दिल्ली), आर्य संदेश (लखनौ), आर्यसंसार (कलकत्ता), समभाव (नागपूर), युगमंथन (नांदेड), लातूर समाचार इत्यादी. ७९ वर्षे होऊनही त्यांनी चिकाटीने व जिद्दीने आपले लेखनकार्य चालू ठेवले अ

## सौ. कमलाबाई भीमाशंकर साखरे



श्री. भीमाशंकरजींच्या पत्नी सौ.कमलाबाई यांचा जन्म शहापूर(गोगी) जि.गुलबर्गा येथे श्री. परशुराम मिरजी यांच्या घरी झाला. त्यांचे शिक्षण चौथीपर्यंत झाले आहे. त्या कन्नडबरोबरच हिंदी आणि मराठी भाषाही जाणतात. पतीच्या प्रत्येक सामाजिक कार्यात सुरुवातीपासूनच त्यांनी साथ दिली आहे. श्री. साखरे पती-पत्नी दोघेही अत्यंत श्रद्धाळू, विनयशील व सरळ स्वभावाचे आहेत. ईश्वर त्यांना उदंड आयुष्य देवो!

\- प्रकाशक

**सुरभारती प्रकाशन**

सीताराम नगर, लातूर